


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष २० : अंक २ उन्हाळा २००२

ब्राह्मी तु भारती भाषा गीर्वाग्वाणी सरस्वती
व्याहार उक्तिर्लपितं भाषितं वचनं वचः

अनुक्रमणिका








## अनुक्रमणिका

**संपादकीय / मराठी भाषेवरचे माझे प्रेम** / १
**कवितेचा घरगंध** / द. भि. कुलकर्णी / ४
**अहिराणीचे भवितव्य** / सुधीर रा. देवरे / ७
**भाषा आणि भाषाभ्यास : ज्ञानेंद्रियांची क्रमवारी** (लेख क्रमांक - १) / अशोक जोशी / १०
**जाता जाता / आपण मराठी का बोलतो?** / शरदिनी मोहिते / १४
**संदर्भसाहित्याची मोहिनी** / पु. कृ. गर्दे / १६
**दखलपात्र / मराठीला पर्याय नाही!** / रझिया पटेल / १८
**साद आणि प्रतिसाद / प्रतिक्रियांविषयीची प्रतिक्रिया** / मो. गो. धडफळे / २२
**एक साद** / मनोहर राईलकर / २६
**अध्यात्माची विशेष परिभाषा व व्यवहार - काही निरीक्षणे** / यशवंत गणेश जोशी / ३५
**पुस्तक परीक्षण / विद्यापीठ प्रशासनाच्या मराठीकरणास साह्यभूत होणारे पुस्तक** /विद्यागौरी टिळक/३७
**भाषाविषयक लेखनाची सूची : इ. स. २००१** / राजशेखर शिंदे / ४१
**'विचक्षणांचे वैलक्षण्य' की दृष्टान्तातील दैवदुर्विलास!** / दा. ल. अडोणी / ४५
**अहिराणी - मराठी कविता** / सुधीर देवरे / ४७
**भाषा वार्ता** / अमेरिका व महाराष्ट्र यातील 'मराठी विद्यापीठाचा सेतू / ५२ विश्वग्रंथजत्रा / ५३
**परिषद वार्ता** / ५४
**मुखपृष्ठ** / अमरकोषे प्रथमं काण्डम्-९ शब्दादिवर्गः / १३ / मलपृष्ठावरील संदेशवाक्य / भ.गा. दुर्वे, पुणे - ५.

---

**प्रकाशन :** **त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर,
गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे,
आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट,
४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
pravinshah@ip.cth.net
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९,
शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा,
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# मराठी भाषेवरचे माझे प्रेम

मराठी नावाचे एक अशक्त आणि किरकिरे मूल आपल्या पोटी आले आहे आणि त्याला लवकरात लवकर वामन गोपाळ यांचा सार्सापरिला किंवा डोंगरे बालामृत पाजून गुटगुटीत निरोगी करायचे आहे अशा थाटात येथील अनेक बुद्धीजीवी बोलत असतात. बुद्धीजीवी म्हणजे तात्पुरत्या ठराविक मुदतीच्या कराराने पैशासाठी बुद्धी भाड्याने देऊन पोट भरणारे लोक. श्रमजीवी याच्या उलट, मात्र वस्तुतः बुद्धीजीवींना शारीरिक कष्ट करावे लागतात आणि श्रमजीवींना डोके वापरावेच लागते; परंतु हा फरक व्यावसायिक सोयीसाठी केला जातो. असो. हे विषयांतर झाले.

सरकार आपल्यापरीने मराठी जोपासत असते. त्याचा सविस्तर आढावा पंच्याहत्तराव्या साहित्य संमेलनामध्ये प.ग. पाटील आणि यशवंत कानिटकर यांनी घेतला. तो पटण्यासारखा होता. प्रयत्न कमी पडले ते बुद्धीजीवी वर्गाकडूनच. आपण जर साहित्य संस्कृती मंडळ आणि तत्सम संस्था, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ वगैरे संस्थांचा, मंडळांचा कारभार नीट तपासला तर वेळ आणि पैसा यांचा बराच अपव्यय आढळतो. अंतर्गत राजकारणाने केलेले घोटाळे आढळतात. ते नेमके कोणत्या व्यक्तींमुळे? याचा ताळेबंद मांडला तर?

खासगी गप्पात हा विषय नेहमी चावला जातो, पण त्याचा पारदर्शक हिशेब सामान्य मराठी भाषकांपर्यंत पोचलेला नाही. इतकी पारदर्शकता आमच्या बौद्धिक जीवनात नाही. उलट डॉक्टर लोक जसे एकमेकाला सांभाळून घेतात तसा प्रकार इथेही आढळतो. अप्रामाणिक आणि अकार्यक्षम माणसाला तडकाफडकी काढले जात नाही. मला वाटते याचे मुख्य कारण असे, की 'शिक्षण' ही अजूनही मूठभरांची मिरासदारी आहे. आनुवंशिक जहागिरीप्रमाणे ती वापरली जाते. शाळेला मराठी भाषा व्यवहार शिकवायचा का 'उतारे' शिकवायचे? आपले विचार मांडता येणे, दुसऱ्याचे बोलणे समजणे, लिहितावाचता येणे इतके शाळेत आले पाहिजे. या दृष्टीने शिकवले जाते का? अभ्यासक्रम तसा आहे का? मराठी वाङ्मयाची आवड असली, की मराठी भाषा शिकवता येते असा गैरसमज अजूनही

का आढळतो? लोकविज्ञान संघटनेचे कार्यकर्ते मराठीत उत्तमरीतीने संकल्पना समजावू शकतात. ते मराठीप्रेमी आहेत असे मला वाटते. भूगोलामध्ये असेच सुरेश गरसोळे प्रभृती आहेत. इतिहासात राजा लिमये आहेत. पण 'मराठी' वरच्या चर्चेत अशांना सहभागी केले जात नाही.

खेड्यात जी. पी. असणारा डॉक्टर स्थानिक मराठीत पेशंटशी सुसंवाद साधू शकतो. यशस्वी होण्यासाठी ते गरजेचे असते. बांधकामांचा ठेकेदार मराठी मजुरांना मराठीत तांत्रिक कामे समजावतो. कार्पोरेट व्यवस्थापनातले माझे स्वतःचे उच्चपदस्थ विद्यार्थी कामगारांशी मराठीत संपर्क ठेवतात. त्यांचा त्यांना फायदाही होतो, ही सर्व मंडळी खरोखर मराठीप्रेमी आहेत. आक्रोशात वेळ घालवत नाहीत.

साक्षरता वाढली की प्रमाणभाषा झपाट्याने बदलणारच. पण खरोखरच जर मराठीवर प्रेम असले तर 'प्रमाणभाषा' झपाट्याने बदलते आहे यात वाईट वाटण्यासारखे काय आहे? ओढूनताणून ती आपल्या लहानपणच्या शालेय पातळीवर स्थिर ठेवणे हे मराठीप्रेम नाही. तो ताठरपणा आहे. तिला विचारांचा कोंदटपणा म्हणूया.

एकविसाव्या शतकातली मराठी कदाचित आमच्या पिढीला नव्याने शिकावी लागेल, तर आळस टाकूया. मराठीवरचे प्रेम मराठी वापरून सिद्ध करूया. आपले मराठी समोरच्याला समजावे, त्याचा आणि आपला संवाद चालू रहावा, इतकेच नव्हे तर सुसंवाद घडावा, हे जितके जास्त प्रमाणात होईल तितके आपले मराठी प्रेम सकस. आमच्या कारकुनांचे 'महान' इंग्रजी साहेबाने चालवून घेतलेच ना? कारण ते यशस्वी राज्यकर्ते होते. मराठी माणसाला अटकेपार झेंडे लावण्याची ताकद पूर्वी होती. ती जशी येईल तशी मराठीही राजमान्य, लोकमान्य होईल.

कधी कधी मला विस्मय वाटतो की संस्कृत भाषेचे दास्यत्व झुगारून, पंडिती काव्याला रामराम ठोकून मराठी बाणा दाखवणाऱ्यांचे वंशज आता इतरांवर 'दास्य' लादण्याची खटपट का करतात? क्लासिकल संस्कृत ही कायमची बासनात बांधलेली भाषा. शुद्ध वगैरे. तरीसुद्धा रेडिओवर वार्तापत्र संस्कृतमध्ये देताना ती आपसूक बदलली आहे. मराठीला हा विवेक का सुचू नये?

मला मराठीच्या प्रेमापोटी काही व्यावहारिक सूचना कराव्याशा वाटतात. 'कसेल त्याची जमीन' या तत्त्वाप्रमाणेच 'बोलेल त्याची मराठी' हे मानावे. संरक्षणखात्यात उत्तम नोकरी हवी असेल तर फक्त मराठी पुरणार नाही. हिंदी आणि इंग्रजी लागेल. ते 'कामचलाऊ' असले तरी चालेल. किंबहुना ते तसे असले





अनुक्रमणिका

तरच जवानांना समजते. त्याचप्रमाणे कामचलाऊ मराठीचा स्वीकार आपणही मोकळेपणाने करावा.

मराठी बोलण्याचा प्रयत्न करणाऱ्याला नाऊमेद करून, त्याचे मराठी तुच्छ लेखून त्याला नीट मराठी आले नाही तर सरकारी नोकरी देऊ नये, असे म्हणून (आणि पर्यायाने स्वतःचे राज्यघटनेबद्दलचेच अज्ञान दाखवून) मराठीप्रेम दिसणार नाही. आपल्याला जगभर नोकऱ्या हव्यात. इतरांनाही महाराष्ट्रात नोकऱ्या हव्याशा वाटाव्यात यातच आपले आर्थिक आणि राजकीय 'भले' आहे.

महाराष्ट्रातील सर्व शाळांत मराठी हा एक विषय म्हणून १० वी पर्यंत सक्तीचा असावा. शाळेचे माध्यम इंग्रजी असो का गुजराथी असो वा कन्नड असो. मात्र पाठ्यपुस्तकातील उतारे गेल्या दहा वर्षांत प्रसिद्ध झालेलेच असावेत. फक्त कथा, कविता नसून इतर विषयांवरील लेखनही समाविष्ट असावे. मराठी कसे वापरले जाते हे त्यातून कळेल. ८ वी ते १०वी साठी यातूनच निवड व्हावी. मुद्दाम धडे लिहून घेऊ नयेत. वर्तमानपत्रांतील लिखाणाचा, आकाशवाणीवरील भाषणांचा, समारंभाच्या वृत्तान्तांचा वगैरे समावेश पाठ्यपुस्तकांत असावा. मराठीतून चाललेले कामकाज अशा स्वरूपाचा मजकूरही असावा.

कॉलेजात स्पेशल मराठी घेणाऱ्यांना त्या वेळी जुने मराठी शिकवावे लागेल. शाळेत त्याची गरज नाही. आजच्या इंग्रजी पाठ्यपुस्तकात शालेय पातळीवर चॉसर असतो का? नसणेच योग्य आहे. आपण मात्र मराठी पाठ्यपुस्तकात शालेय पातळीवर उगीचच जुने वाङ्मय कोंबतो. ते बंद करावे.

शाळेत १०वी पर्यंत मराठी शिकणाऱ्यांना आत्मविश्वासाने मराठी बोलता, ऐकता, लिहिता व वाचता यावे हा उद्देश मराठी विषयाच्या शिक्षणाचा असावा.

वऱ्हाडी बोलीभाषेतले कथाकथन, बेळगावी मराठीतले भाषण वगैरे बोलींच्या विविधतेचा जाणीवपूर्वक समावेश पाठ्यपुस्तकांत असावा. आपलेच मराठी शुद्ध हा अहंकार लहान वयातच नाहीसा होणे फार गरजेचे आहे.

'कॅथॉलिक' टेस्ट मुलांमध्ये रुजावी यासाठी शिक्षकांच्यात ती रुजली पाहिजे. या दृष्टीने बी.एड. इत्यादींच्या अभ्यासक्रमात योग्य बदल करावेत. वाचकहो, कळावे, लोभ असावा (मराठीवर) ही विनंती.

■

**आशा मुंडले**

# कवितेचा घरगंध

द. भि. कुलकर्णी

वाचक कविता वाचतो.
रसिक कविता माचवतो.
समीक्षक कवितेची पुनर्निर्मिती करतो.

समीक्षा लिहितात ते सगळेच समीक्षक नसतात; समीक्षा समजून काही कविचरित्र लिहितात, काही काव्यचरित्र लिहितात, काही संहिता-संशोधन करतात - ते समीक्षक नसतात; त्यांचे कार्य समीक्षेच्या सरहद्दीवरचे असते; ते इतर क्षेत्रांत महत्त्वाचे असते; पण ती समीक्षा नसते.

सगळेच कविता-वाचक कविता वाचीत नसतात. काही छंद वाचतात आणि नादमधुरतेने सुखावतात; काही भावना चोखतात आणि हुळहुळतात; काही सामाजिक आशयाने उद्दीपित होतात. हे सर्व वाचक कवितेची सोंड, तिचे सुपाएवढे कान, तिचे खांबासारखे पाय, तिची दोरीसारखी शेपूट हातात धरून बसतात. त्यांचे आकलन मिथ्या नसते पण आंशिक असते. त्रिकोणाची एक एक रेषा पाहिली म्हणून तुम्हांला त्रिकोणाचे आकलन होईल का? त्रिकोण ही एक पूर्णाकृती असते. तीन रेषांचा नव्हे तर तीन रेषा असलेल्या एका पूर्णाकृतीचा प्रत्यय घेतला पाहिजे तर त्रिकोण कळेल; नाहीतर एकामागोमाग एक तीन रेषा कळतील - एकच रेषा कळेल; त्रिकोण कळणार नाही. कविता आकृती नसते; भूमितीय आकृती तर नसतेच. कविता ही भूमितीय आकृती नसते तर ती एक जिवंत अस्तित्व असते.

कविता जो नुसताच वाचतो तो नुसताच झाड पाहातो. कविता जो माचवतो तो कविता चोखतो. जो कवितेचे बीज आपल्या मनात पेरतो त्याला कवितेची असंख्य बीजं लाभतात.

कवितेचा अर्थ कळणे म्हणजे कविता कळणे नव्हे; मुद्दली तोच कळला नाही, तोच अस्तित्वात नाही असे असेल तर बोलायलाच नको. अर्थ हवाच, त्याचा बोधही हवाच; पण अर्थ म्हणजे अर्थात दर्शनी अर्थ - हा कवितेचा एक लहानसा घटक असतो - त्रिकोणी जागेमधील एक एवढासा बिंदू - केंद्रबिंदू नव्हे, कोनही








नव्हे, रेषाही नव्हे-एक लहानसा बिंदू. तोच नसेल तर कविता अस्तित्वातच येणार नाही, भाषा अस्तित्वातच येणार नाही; तो भाषाभास असेल, काव्याभास असेल. फक्त मनोविकार तज्ज्ञच अशा कृतीचा अन्वय लावू शकतो; त्या शब्दांचा नव्हे, शब्द उच्चारणाऱ्या मनाचा. तो आपला प्रांत नव्हे; आपला प्रांत भाषा.

दर्शनी अर्थाशिवाय आणखी काय असते कवितेत? दर्शनी अर्थातून निघणारे अर्थझंकार असतात; त्या अर्थझंकारांचे चपळ आणि परिवर्तनशील व्यूह असतात; अशा व्यूहांची मिटती-उमलती केंद्रे असतात. एवढेच नव्हे तर सलग जीवनपटातून त्या कवितेने स्वतःचे रूप वेगळे काढलेले असते - खर्ड्यातून नकाशा कापून काढावा तसे. तिथे एक रिक्तता आलेली असते; आणि ती रिक्तता बाहेर काढलेल्या आकृतीचीच पुनरावृत्ती असते - ती उर्वरित जीवनपटाकडे - स्वतःकडेच नव्हे - उर्वरित जीवनपटाकडे आपले लक्ष वेधित असते; मी एकटी नाही, सुटी नाही, मी या जीवनपटाचाच एक अखंड घटक आहे असा आक्रोश ती पोकळी करीत असते.

ही रिक्तता हेच कवितेच्या पुनर्निर्मितीचे बीज असते. त्या रिक्त आशयबोधक आकृतीवरून रसिकतेची अंगुली फिरत जाते; एकाच वेळी त्या रसिकतेला कवितेच्या दर्शनी अर्थाचा, अर्थझंकारांचा, झंकारव्यूहांचा आणि त्या कवितेच्या सरहद्दींचा, तिचा सलग जीवनपटाशी असलेल्या मूल्य-अर्थ-रूप-नाद यांच्या संबंधांचा प्रत्यय येतो.

एवढेसे शब्द ते काय - त्यांनी चमत्कार केलेला असतो. मांत्रिकाने मंत्र उच्चारून बीजावर हबका मारावा, त्यातून सरसरून वेली बाहेर यावी, पाहता पाहता त्या वेलीस पाने-फुले यावीत, तिने गगनापर्यंत मजल मारावी, तिथे आपले हात तर पोचत नाहीत म्हणून भुईवर ओघळलेली फुले वेचावीत तर वर वर, वरचेवर कळ्या उमलून त्यांची पुष्पे व्हावीत; तर्काची संध्याकाळ झालेली असावी, त्या बीजापुढे आपण समई लावावी - विदग्धतेची, त्याच्यापुढे मान लववावी तर केसात माळलेल्या कळ्यांची फुले झालेली असतात आणि आपसुख ती बीजदेवाच्या चरणी पडतात.

आश्चर्य त्याचे नसते; आश्चर्य हे की आपली घरची साधीसुधी फुले हुबेहूब त्या लावण्यलतिकेवरील फुलांसारखीच असतात - रंग थोडा फिक्का, पाकळ्या जरा कमी, मुरड थोडी वेगळी - पण गंध? गंध अगदी तोच तसाच तेव्हढाच असतो - वेलीवरची फुले आपण तोडलेली नसतात - आपली काय प्राज्ञा - भुईवरची फुले आपण वेचलेली असतात - ती आपण त्या देवतेलाच अर्पण केलेली असतात -

आपल्या माथ्यावर आपल्या घरच्याच कलिका असतात - आपण नम्र झालो म्हणून की आपण फुले वेचली म्हणून की कशाने कुणास ठाऊक आपला घरगंध आसमंतातल्या निर्मितिगंधाशी एकजीव झालेला असतो-कवितेमुळे आपला पुनर्जन्म होतो; आपल्यामुळे कवितेचा पुनर्जन्म होतो.

■

**जंतरमंतर, अमरावती मार्ग, नागपूर ४४० ०१०**

---

# भाषेची भूक

भाषेतील अर्थाच्या नाजूक छटा, चित्रमयता, कृतींची ध्वनिमयता व्यक्त करणारे शब्द लुब्ध झाले की भाषा अंमळ सरधोपट वाटायला लागते. साधी गोष्ट असते. व्यक्तीनं एखादं पेय पिणं, पण आपली भाषा पेयाचा दर्जा कळत नकळतपणे ते पिण्याचं वर्णन करणाऱ्या क्रियापदातून सुचवत असते, असं जाणवतं. माणसं चहा ढोसतात, कॉफी किंवा कोको पितात, दूध मात्र घेतात. दूध हे पवित्र. ते एखाद्या तीर्थासारखं घ्यायचं. चहाचं व्यसन बाजी ह्या गटात केव्हाही परावर्तित होऊ शकणारं. म्हणून चहा पिणं हे ढोसणं. त्यामानानं कॉफी-कोको निरुपद्रवी. प्या! आता 'चाय पिलाओ'- मला चहा, कॉफी, कोको काहीतरी पाज - अशासारख्या शब्दांमध्ये पिण्याची कृती राहिली, पण सूक्ष्मसा मूल्यविवेक लोप पावला. साधं दैनंदिन रांधणं जरी घेतलं तरी आपण किती क्रियापदं वापरतो बघा. दही मोडतो. आधण ठेवतो. चहा टाकतो. तांदूळ वैरतो. घावन घालतो. आताच्या ढोबळभाषेत चहाही करायचा, ताकही करायचं. भातही करायचा, घावनही करायचं. पुष्कळ लोक तर ह्यासाठी 'बनवणे' हे क्रियापदही वापरतात. मी टोस्ट छान बनवलेले, तू पटकन भात-पिठलं बनव. वगैरे म्हटलं की मला एकदम बनवल्यासारखं वाटतं. बनवा! भाषा बनवून बनवून लोकांना बनवत राहा! आपण बनवले जातोय हेही त्यांना कळत नाही. ह्या कर्माला काय करावं? खाना बनाना म्हणून 'जेवण बनवलं', खाना लगाना म्हणून 'जेवण लावलं' असे ऐकण्याने पोटाची भूक चाळवली तरी भाषेची भूक अवचित मरून जाते असा अनुभव निदान मला तरी येतो.

■

**मंगला गोडबोले**

**ट्रान्सवाद, अनुलेशन आणि बरंच काही, 'सेतुबंध' दिवाळी २००२, पृ. ७८**

---






# अहिराणीचे भवितव्य

सुधीर रा. देवरे

जगातील प्रत्येक कोपरा बोलीभाषेने व्यापलेला आहे. प्रत्येक कोनाकोपऱ्यात ती बोलली जाते. मात्र यापैकी काही बोलीभाषा आज नामशेष झाल्या आहेत, तर काही बोलीभाषांचा विकास होऊन त्या आज प्रमाणभाषा झालेल्या दिसून येतात. हा बदल आपल्याला ज्ञातच आहे. आज व्यवहारात वापरली जाणारी हिंदी भाषादेखील एकेकाळी केवळ बोलीभाषा म्हणूनच वापरली जात होती; परंतु आज तीच भाषा आपली राष्ट्रभाषा म्हणून मान्यता पावलेली दिसून येते. त्याचप्रमाणे सिंधी, गुजराती आणि मराठी ह्यासुद्धा एकेकाळी केवळ बोलीभाषेच्या स्वरूपातच अस्तित्वात होत्या.

संपूर्ण भारतात आढळून येणाऱ्या बोलीभाषांची संख्या जवळजवळ अठराशे इतकी आहे. त्यांपैकी अनेक बोलीभाषा पूर्वीच नष्ट झालेल्या आहेत, तर अनेक बोलीभाषा आजही नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. अशीच एक बोलीभाषा म्हणून 'अहिराणी' भाषेचा नामोल्लेख करावा लागतो. अहिराणी महाराष्ट्राच्या नाशिक, धुळे, जळगाव आणि नंदुरबार ह्या चार जिल्ह्यांमध्ये मोठ्या प्रमाणावर बोलली जात असूनही तिला आजपावेतो प्रमाणभाषेचा दर्जा प्राप्त झालेला नाही. भाषाशास्त्राने तर 'अहिराणी'ला मराठी भाषेची एक पोटभाषा म्हणून तिची उपेक्षाच केलेली दिसून येते.

प्राचीन काळी 'अहिराणी' अभिर लोकांची भाषा होती. म्हणून तिला 'अभिराणी' असं संबोधलं जात असे. कालांतराने तिचा अपभ्रंश होऊन तिला 'अहिराणी' म्हणूनच संबोधण्यात येऊ लागले आणि आजही आपण तिला 'अहिराणी' म्हणूनच संबोधतो. (अभिर-अहिर-अहिराणी.) अभिर लोकांचे संदर्भ रामायण, महाभारत कालखंडातही आढळून येतात. भरताचे नाट्यशास्त्र ह्या ग्रंथात अहिराणीचा उल्लेख बोलीभाषा असाच केलेला आहे. ह्या भाषेचा उदयकाल साधारणतः इसवी सनाच्या तिसऱ्या-चौथ्या शतकांत झालेला असावा, असे मानले जाते. प्रदेशाच्या नावाने अहिराणीला 'खानदेशी' तर राजवटीच्या नावाने तिला

'बागलाणी' संबोधले जाते. मराठी, हिंदी, गुजराती, राजस्थानी, बंगाली ह्या भाषेतील काही शब्दही अहिराणी भाषेत आढळून येतात. म्हणूनच अहिराणीला कोणत्याही एका विशिष्ट भाषेची पोटभाषा संबोधणे सर्वस्वी चुकीचेच ठरते.

बोलीभाषेच्या संदर्भात काही अपवाद वगळता बेजबाबदार लेखनच अधिक प्रकाशित झालेले दिसून येते, जे बोलीभाषेच्या विकासासाठी मारकच ठरते. बोलीभाषेतून संवाद साधण्यासाठी लोकांना प्रेरणा मिळेल, त्यांच्या प्रयत्नांना प्रोत्साहन मिळेल अशा हेतूने बोलीभाषेतील बलस्थानांचा अधिक अभ्यास व्हायला हवा. दुय्यम प्रतीचे लेखन, उदाहरणांचा अभाव, ढोबळ पुराव्यांच्या आधारावर केली गेलेली निश्चित विधाने, हितसंबंध, सामाजिक, प्रतिष्ठेच्या आततायी कल्पना, दुसऱ्या भाषेच्या संदर्भातील अज्ञान, पूर्वग्रह, दुराग्रही वृत्ती, ठोस पुराव्यांचा अभाव, ऋण मानण्याचा अभाव, पाहताक्षणी लक्षात न येणारी जोडतोड करून लिखाण करणे ह्या प्रकारांमुळेच बोलीभाषेचा विकास खुंटलेला दिसून येतो.

सर जॉर्ज ग्रियर्सन (१८५१-१९४६) यांनी भारतातील संपूर्ण भाषांचा सखोल अभ्यास केलेला आहे. क्षेत्रीय व्यापकता, भाषांचा संख्या आणि विविधतेच्या दृष्टीतून बघितले तर त्यांचे भाषाविषयक कार्य निश्चितच महत्त्वाचे आहे. ह्या संदर्भातील सर्व महत्त्वाची माहिती 'Linguistic Survey of India' ह्या नावाने ग्रथित करण्यात आलेली आहे. ह्या ग्रंथाच्या नवव्या भागात त्यांनी अहिराणीच्या संदर्भात आपले मत व्यक्त केले आहे. त्यांनी 'अहिराणी'ला भिल्लांची भाषा म्हटले आहे : परंतु अहिराणी हीसुद्धा हिंदीप्रमाणे एक लोकभाषा आहे. केवळ अहिराणीचाच असे नव्हे तर कोणत्याही भाषेचा संबंध कोणत्याही जाती-जमातीशी लावणे, हे मानवतेच्या दृष्टिकोणातून अयोग्य आहे. भाषेने जर व्यक्तीवर विशिष्ट जातीचा शिक्का मारला जात असेल वा भाषेवर विशिष्ट जात लादली जात असेल तर ही गोष्ट बोलीभाषेच्या विकासाला मारक ठरते.

लोकांच्या वर्तनातून लोकसंस्कृती संक्रमित होत असते. प्रवाहित होत असते, म्हणूनच कोणत्याही बोलीभाषेचा अभ्यास हा त्या बोली भाषेतील लोकवाङ्मयाच्या अभ्यासाशिवाय अपूर्णच ठरत असतो. लोकवाङ्मयाच्या माध्यमातूनच आदिवासी बंधू-भगिनींच्या श्रद्धा, रीतीरिवाज, पूजा-अर्चना, संस्कृती, आशा-आकांक्षा, शेती, व्यवहार, नातेसंबंध, सण-उत्सव इत्यादींवर प्रकाश पडत असतो.

'ऋषीचे कूळ आणि नदीचे मूळ' जसे विचारले जात नाही तसे भाषांचे कूळही विचारू नये. कारण भाषा ही केवळ भाषा असते आणि ती स्थानिक

संस्कृतीतून उगम पावलेली असते. मग ती कोणतीही भाषा असो. अगदी इंग्रजी असली तरीसुद्धा.

आदिवासी बोलींचे डाक्युमेंटेशन होणे आज आवश्यक झाले आहे. जी माणसं निरक्षर राहिलेली आहेत, तीच केवळ बोलीभाषेतून व्यवहार करताना दिसतात; परंतु साक्षर झालेली माणसं मात्र लिखाणासाठी आणि व्यवहारासाठी प्रमाण-भाषेचाच वापर करताना दिसून येतात. मग ते 'अहिराणी' भाषक असोत की अजून कोणी, ते मराठी, हिंदी किंवा इंग्रजीतच लिहिण्याचा अट्टहास दाखवतात. मातृभाषेतून संवाद साधण्यातही जेथे त्यांना संकोच वाटू लागतो तेथे मातृभाषेतून लिखाण तर दूरची गोष्ट आहे. हा संकोच दूर करण्यासाठीच डॉ. गणेश देवी स्थापित भाषा केंद्र 'ढोल' हे नियतकालिक दहा भाषांमध्ये प्रकाशित होते. एकीकडे जेथे बोली - भाषेसाठी न्यूनगंड दिसून येतो, तेथेच दुसऱ्या बाजूला ह्या बोलीभाषांना प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी 'ढोल'च्या माध्यमातून प्रयत्नही सुरू झालेले आहेत.

आपल्या भारतीय संविधानाच्या आठव्या परिशिष्टात भाषिक स्वायत्ततेच्या संदर्भात मार्गदर्शन केलेले आहे. त्या अन्वये कोणत्याही भारतीय व्यक्तीस आपली भाषा बोलण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य देण्यात आलेले आहे. तरीही शाळा-महाविद्यालयांमध्ये बोलीभाषेतून शिकविण्यासाठी रुची दाखवली जात नाही. लोकांना आपल्या भाषेपासून दूर ठेवणे हे त्यांची जिव्हा कापण्यासारखेच आहे. म्हणूनच लोकांना आपल्या भाषेपासून वंचित करणे हे लोकअधिकारांचे उल्लंघनच ठरते.

भाषा कोणतीही असो, जर ती व्यवहारभाषा, वाङ्मयभाषा आणि ज्ञानभाषा होत असेल तर ती प्रमाणभाषेचा दर्जा प्राप्त करू शकते. बोलीभाषांचे संवर्धन करणे हाच 'ढोल'चा प्रमुख उद्देश आहे. भाषा हे संस्कृतीचे माध्यम आहे. 'ढोल'चा उद्देश जर सफल होत असेल तर भारतीय बोली भाषांचे भवितव्य निश्चितच उज्ज्वल आहे, पण हा ढोल वाजविण्यासाठी आपल्या सबळ हातांची आम्हाला नितांत गरज आहे.

(दिनांक १०-१२-२००१ रोजी 'भारतीय आंतरराष्ट्रीय केंद्र' नवी दिल्ली येथे भरलेल्या 'लोक अधिकार परिषदे'त वाचलेल्या हिंदी निबंधाचा मराठी अनुवाद.)

■

**बसस्थानकामागे, सटाणा, जि. नाशिक ४२३ ३०१.**










# भाषा आणि भाषाभ्यास : ज्ञानेंद्रियांची क्रमवारी

(लेख क्रमांक - १)

अशोक जोशी

मनुष्याला ज्ञानेंद्रिये पाच आहेत हे सामान्यतः सर्वांनाच माहीत असतं, आणि या पाच प्रकारांशिवाय जगाची अनुभूती देणारी एखादी सहावी पद्धत आपल्याजवळ आज तरी नाही. शिवाय या पाचांपैकी प्रत्येकाचे अनुभव-विषय आणि क्षेत्र वेगवेगळी आहेत. उदाहरणार्थ, डोळ्याला दृष्य दिसलं तरी वास किंवा चव मुळीच कळत नाही. साहजिकच पाची ज्ञानेंद्रियांच्या आणि त्यांच्या अनुभवांच्या तुलनात्मक अभ्यासाला खूपच मर्यादा पडतात. परिणामी हा तुलनात्मक अभ्यास खूपच उपेक्षित राहिला आहे. तसं पाहिलं तर वैद्यकीय क्षेत्रात नाक, कान, े अशा प्रत्येक इंद्रियाचा खूप अभ्यास झाला आहे आणि खूप तपशीलही गोळा झाला आहे. त्यामुळे उणीव तपशिलाची नाही तर त्याच्या सुसंगत मांडणीची आहे. हा असला विषय 'भाषा आणि जीवन'सारख्या नियतकालिकात का यावा असा प्रश्न वाचकाला पडू शकतो म्हणून आधी ते सांगतो.

समाजातल्या अगदी डॉक्टर, इंजिनियर, प्राध्यापक आणि काही इतर अशा पाच-पंचवीस लोकांना जर "आपल्या ज्ञानेंद्रियांत सर्वांत महत्त्वाचं किंवा कार्यक्षम इंद्रिय कोठचं?" असा प्रश्न केला तर "डोळा" हेच उत्तर येतं. ही समजूत अशी सगळीकडे कशामुळे पसरली हे सांगता येत नाही, परंतु ती चुकीची आणि अवैज्ञानिक आहे. एवढं मात्र खरं! अशा या चुकीच्या गृहीतकावर आधारून कोणी एखाद्या मुद्याचं विवरण केलं तर तेही त्या प्रमाणात चूक असणार हे उघडच आहे. याबाबत निदान भाषाभ्यासाच्या क्षेत्रात अपवाद असेल असं मला वाटलं होतं, पण आधुनिक भाषाभ्यासी किंवा सनातनी पंडित यांच्यापैकी कोणीच या प्रश्नाचा विचार केलेला नाही हे आढळून मला तरी मोठा खेद वाटला, इथे मी दोन उदाहरणं देतो, **१) आधुनिक :-** 'वैखरी' या पुस्तकात 'लिपी आणि लेखनव्यवस्था' या प्रकरणात पान क्र. ९३ वर डॉ. अशोक केळकर म्हणतात, "अशावेळी माणसाचे सर्वात कार्यक्षम असे ज्ञानेंद्रिय जो डोळा त्याच्यामार्फत कार्यभाग साधून घेण्याचा प्रयत्न त्याने करणे हे क्रमप्राप्त

होते." (अधोरेखा माझी) **२) सनातनी :-** आपल्या जुन्या साहित्यात शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ही शब्दावली नेहमी पाहण्यात येते. "आता ही काही तर्कशुद्ध क्रमवारी आहे की वृत्ताच्या किंवा उच्चाराच्या सोयीने झालेली मांडणी आहे?" असा प्रश्न मला पडला. शिवाय गोस्वामी तुळसीदासांच्या 'मानसात', "क्षिती, जल, पावक, गगन, समीरा" अशी ओळ आहे; म्हणजे क्षितीपासून चढती भाजणी पाहिल्यास गगन आणि समीर यांच्या जागांची उलटापालट झाली आहे; आणि ती वृत्ताच्या सोयीकरता झाली आहे हे उघडच आहे, म्हणून हाच प्रश्न घेऊन मी काही थोर व्यक्तींना भेटलो. १९६० मध्ये मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागाचे प्रमुख प्रा. गजेंद्रगडकर होते. त्यांना प्रश्न केल्यावर, "आकाश, वायू, तेज, आप आणि पृथ्वी असा आपल्या तत्त्वज्ञानानुसार पंचमहाभूतांचा उतरता क्रम असल्याने त्यांच्या अनुभूतींचाही शब्द, स्पर्श, रूप ...... असा क्रम योग्यच आहे." असं उत्तर मिळालं. थोड्याफार फरकानं याच प्रकारचं उत्तर श्री. बाळशास्त्री हरदास यांनीही दिलं. माझं मुळीच समाधान झालं नाही, कारण त्यामागे तर्क किंवा अनुभव काय आहे हे काहीच समजलं नाही.

या पाच ज्ञानेंद्रियांचा थोडा ढोबळ मानानेही विचार केला तर एक गोष्ट लक्षात येते, ती म्हणजे वास आणि चव यांचा (कम्युनिकेशन) संप्रेषण यादृष्टीने वापर आणि उपयोग निदान मानवी पातळीवर फारच मर्यादित आहे. प्राणीसृष्टीत मात्र निदान गंध संवेदना प्रबळ असते. असो; म्हणून आताच्या आपल्या विवरणातून चव आणि वास ही दोन बाजूला ठेवू. म्हणजे समाजजीवनाच्या दृष्टीने मानवाकरता 'शब्द', 'स्पर्श' आणि 'रूप' याच महत्त्वाच्या अनुभूती आहेत. आता यांच्यातही काही सरस निरस ठरवता येतं का ते पाहू. त्यासाठी खाली काही प्रश्नोत्तर देतो,

१) जन्मजात अंधळा आणि जन्मजात बहिरा यांत अधिक चलाख, कार्यक्षम आणि आपली प्रगती करून घ्यायला समर्थ कोण? .... अर्थातच 'अंधळा' (म्हणजे दृष्टीहीन पण श्रवणयुक्त) हा मुद्दा स्पष्ट करायला फार उदाहरणांची गरज नाही. जन्मजात अंधळे असलेले कितीतरी गायक, वादक कलाकार आणि बुद्धिबळपटूसुद्धा प्रसिद्ध आहेत. हे प्रमाण जन्मजात बहिऱ्यांत अजिबात नाही. शिवाय जन्मजात बहिरा हा बहुधा मुकाही असतो. ध्वनीची कल्पना नसल्याने स्वरयंत्र शाबूत असूनही त्याला ते वापरता येत नाही. 'हेलन केलर' हा अब्जावधीत एखादाच अपवाद.

२) झोप लागतेवेळी सर्वांत शेवटी शांत होणारी ज्ञानसंस्था कोणती?.... श्रवणच.

३) जागृतीच्या वेळी सर्वांत प्रथम कार्यान्वित होणारी संस्था कोणती?.... श्रवणच, म्हणून भूपाळ्या किंवा मंगलवाद्य ऐकत जाग यावी अशी भारतात मान्यता होती.

४) प्रत्येक ज्ञानसंस्थेला आपला भोग्य विषय असतो. म्हणजे दृष्टीचा भोग्य विषय प्रकाश तर श्रवणाचा ध्वनी. प्रकाश उत्पन्न करणं आणि त्याच्या साहाय्यानं पाहाणं हे काही शरीरात होत नाही; परंतु ध्वनी उत्पन्न करणे व तो ऐकणे हे एकाच शरीरात होते, म्हणजे उत्क्रांतीच्यादृष्टीने एक तरी टप्पा पुढे असलेली, अधिक स्वायत्त आणि स्वयंपूर्ण संस्था कोणती?... श्रवणच.

५) समजा एखाद्या एकांत ठिकाणी डाकबंगल्यात तुमचा मुक्काम आहे. अशावेळी सर्व खोल्यांतले दिवे लावले तरी एकटेपणा जाणवत राहतो, पण तेच एखादी टेप लावली की जणू ती व्यक्तीच सोबतीला आहे असे वाटते आणि तेही नसल्यास आपणच एखादे स्तोत्र अथवा गाणे मोठ्याने म्हणू लागलो की आपल्याच अस्तित्वाची जणू तेवढी वृद्धी होऊन स्वतःचीच स्वतःला सोबत होते आणि एकटेपणाचा ताण कमी होतो. तात्पर्य 'श्रवण' श्रेष्ठ.

६) तीन मित्रांनी सिनेमा पहावा, तो असा की एकाचे डोळे झाकलेले, तर अगदी कणकीचे गोळे लावून दुसऱ्याचे कान बंद, पण डोळे उघडे. तिसरा मात्र साध्या अवस्थेत. आता घरोघरी टी.व्ही. असल्याने हे घरीच करता येईल. थोडक्यात म्हणजे मूकपट, श्रुतिका आणि बोलपट अशा तीनप्रकारे तिघेजण एकाच सिनेमाचा अनुभव घेत आहेत. ज्याने साध्या अवस्थेत पाहिला त्याला शंभर टक्के, ज्याने नुसता ऐकला त्याला ८५ ते ९० टक्के; तर ज्याने नुसता पाहिला त्याला ५० टक्क्यांहून कमीच बोलपट कळतो असं आढळून येईल. तुलनेतच बोलायचं तर श्रवणाचं कार्य आणि महत्त्व दृष्टीहून अधिक.

नागपूरचे प्रा. चंद्रशेखर डाऊ आपल्या 'संगीताचे शास्त्र' या लेखात लिहितात, "वेगवेगळ्या पण एकत्रित कंपनांमधून आवाजाचा कोलाहल निर्माण होतो. मात्र या गोंगाटातही घटक ध्वनी वेगवेगळे स्पष्ट ओळखण्याची आपल्या कानांची पृथक्करण क्षमता आश्चर्यकारक आहे. दृष्टीच्या संदर्भात अशी क्षमता आपल्या डोळ्यांमध्ये नाही..... अनेक पोरांच्या एकत्रित रडण्यातून आईला आपल्या मुलाचे रडणे बरोबर ओळखू येते." थोडक्यात म्हणजे 'श्रवण' संस्थेचं

कार्य आणि महत्त्व ज्ञानेंद्रियांत तरी सर्वश्रेष्ठ आहे. तपशीलच द्यायचा झाला तर हा लेख पुष्कळच वाढवता येईल. तेव्हा तसं न करता आपल्या मूळ चर्चेकडे वळू. श्रवणाचं हे असं महत्त्व प्राचीन भारतात कळलं असावं हे अनेक उल्लेखांवरून उघड होतं. किंबहुना त्यामुळेच मौखिकतेला प्राधान्य देऊन संस्कृती उभी झाली. असो.

श्रवणाला किती सूक्ष्म पातळीपर्यंत नेता येतं याची एक दोन उदाहरणं देणं इथे अप्रस्तुत होणार नाही. जॉन लेगमन आपला अनुभव सांगतात, 'ॲट ए फ्रेंडस् हाऊस वन्स, माय् वाईफ ओपण्ड् हर पर्स ॲण्ड सम कॉईन्स स्पिल्ड आऊट, वन आफ्टर अनादर ऑन टु द फ्लोअर. "थ्री क्वार्टर्स, टू डाईम्स, ए निकेल ॲण्ड थ्री पेनीज" सेड अवर होस्ट ॲज ही केम इन फ्रॉम द नेक्स्ट रूम. ॲण्ड ॲज ॲन आफ्टर थॉट : "वन ऑफ द क्वार्टर्स इज सिल्वर." ही वॉज राईट डाऊन टु द लास्ट पेनी.

असाच एक अनुभव २०० वर्षांपूर्वीचा चार्ल्स डार्विनचे आजोबा इरॅस्मस डार्विन यांचा नोंदलेला आहे. श्री. इरॅस्मस यांचे एक अंध मित्र प्रथमच त्यांच्या घरी आले होते. पण काही थोडं बोलणं होताच म्हणाले, "ही खोली २२ फूट लांब, १८ फूट रुंद आणि १२ फूट उंच आहे." सगळी मापं अचूक होती.

मात्र असे अनुभव फक्त अंधांनाच येतात अशी एक समजूत पुष्कळांची असते ती अगदी चुकीची आणि अशास्त्रीय आहे हे इथे लक्षात ठेवायला हवे.

आता प्रश्न येतो की ज्ञानेंद्रियांत श्रवण (बोलणं धरून) सर्वांत श्रेष्ठ आणि महत्त्वाचं हे मान्य. पण दुसरा क्रमांक कोणाचा? स्पर्श की दृष्टी? आणि ते आपण पुढच्या लेखात पाहू.

■

**'श्रद्धा', ५४, लक्ष्मीनगर, नागपूर - ४४० ०२२. फोन - ०७१२-२२२५३९**

**मुखपृष्ठावरील श्लोकाचा अर्थ -**

ब्राह्मी, भारती, भाषा, गीः, वाक्, वाणी, सरस्वती, व्याहारः, उक्तिः, लपितम्, भाषितम्, वचनम्, वचः

एवढे शब्द भाषेसाठी अमरकोषात दिलेले आहेत.

# आपण मराठी का बोलतो?

शरदिनी मोहिते

हल्लीच्या आमच्या हुषार चिमखड्यांची आज काय स्थिती आहे, हुषारीचं चांगल भरभरून कौतुक होतं यात शंका नाही; पण ही मुलं त्यांच्या शाळेत इंग्लिश मिडियमच्या स्वभाषेत बोलली, तर त्यांना शिक्षा होणार! ... सुरुवातीला तर ही नवी भाषा पुरेशी अवगत झालेली नसते. आपल्या मनातले विचार पुरेसे प्रकट करता येत नसावेत त्यांना. शिवाय काय बोलायचं ते पुरं संपूर्ण बोलायची ऊर्मीही त्यांना गप्प बसू देत नसते. पटकन एखादा शब्द, क्वचित एखादं वाक्यही स्वभाषेत प्रकट होतं, त्या घोर अपराधासाठी त्यांना शिक्षा भोगावी लागते! जरा समजूतदारपणानं घेतलं तर काय आकाश कोसळणार आहे? उलट, थोडी तडजोडीची भूमिका घेतली, तर अधिक वेगाने साध्य साधले जाईल!

आणखी एक गोष्ट म्हणजे मुलांना चांगलं इंग्लिश यावं म्हणून घरातल्यांनीही त्यांच्याशी सतत इंग्लिशमधून बोलावं अशी अपेक्षा करण्यात येते. काही कुटुंबांनी ही कल्पना उचलून धरलेली असते. येता-जाता घरी आणि (शाळेच्या) दारी देखील इंग्लिश कानावर पडणार. शिवाय विविध माध्यमांतून इंग्लिशची जवळीक, होतच असते.

अर्थात काही उत्साही पालकांचे इंग्लिश 'भन्नाट' असते! आणि त्यांची स्वतःची अभिमानी समजूत अशी असते की आपणही फाडफाड इंग्लिश बोलतो. बोलण्याच्या लकबीनुसार फाडफाड वाटणारं ते इंग्लिश अचूक असतंच असं नाही. एवढंच नाही, तर धाटणीच्या, व्याकरणाच्या भयानक चुका त्यात चमकत असतात.

अलीकडच्या एकूण स्थितीत शाळेत इंग्लिश आणि घरी मराठी बोललं जात असलं म्हणजे मुलांच्या मनात गोंधळ उडणं साहजिक असतं आणि भाषिक मिसळीचा 'अक्षम्य' गुन्हा त्यांच्या हातून घडतो, अगदी स्वाभाविकपणे!







मराठीतला सहज सुलभ गोडवा आपल्याला अनुभवायला मिळालेला असतो. तिच्या सोज्वळ संपन्न आविष्काराची अभिन्न अभंग संगत मनात वास करत असते आणि जेव्हा आपलंच मूल आपल्याला विचारतं की 'आई आपण मराठी का बोलतो?' तेव्हा आपल्या मराठी सुसंस्कृततेला प्रचंड हादरा बसतो आणि आपण सुन्न होऊन जातो.

आपण मराठी आहोत, म्हणून आपण मराठी बोलतो. ही श्वासाइतकी सहज गोष्ट मुलांना समजावून सांगायची वेळ येते. तेव्हा पोटात तुटल्याशिवाय रहात नाही. कारण आपलं मराठीपण, आपलं मराठी अस्तित्व किती भयंकर तणावाच्या शिगेवर, कसंबसं तोल सावरत, तग धरून राहिलेलं आहे याची जाणीव अस्वस्थ करून जाते.

अशा वेळी, इथली सुजाण मंडळी, आणि परदेशी वास्तव्याला जाऊन राहिलेले काही लोक निश्चयपूर्वक आणि प्रेमानं, जिव्हाळ्यानं आणि अभिमानानं मराठीच बोलत रहातात, तेव्हा कुठेतरी आशेचा किरण दिसतो. अशा लोकांची कितीदा तरी टिंगल होते; परंतु त्यांच्या या गोष्टीचं मोल खरोखरच अपरंपार आहे याची जाणीव झाल्याशिवाय राहात नाही!

■

**ए१/४ शरयू सरिता नगरी फेज २, सिंहगड रोड, पुणे - ४११०३०.**
**फोन - ४३३८३५३/४३३०२०८**

## भाषावार्ता

पुण्यातील महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था ही शंभर वर्षांहून जुनी आहे. पूर्वी पेशवे दरवर्षी विद्वानांना दक्षिणा वाटत. ही पद्धत इंग्रजांच्या राजवटीत एल्फिन्स्टनने 'दक्षिणा फंड' या नावाने सुरू ठेवली. त्यातूनच पुढे महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था स्थापन झाली. त्यांच्याकडे आलेल्या पुस्तकांपैकी निवडक पुस्तकांना ही संस्था पुरस्कार देऊन उत्तेजन देण्याचे काम करते आहे. संस्थेतर्फे मराठी भाषेचा प्रसार करण्यासाठी 'भाषावार्ता' नावाचे एक छोटेखानी मासिक प्रसिद्ध केले जाते आणि ते वाचकांना मोफतही पाठवले जाते. त्यात व्याकरण व पाढे यांनाच प्राधान्य दिले जाते. मात्र या संस्थेला मान्य असलेल्या जुन्या वळणाच्या शुद्धलेखनाच्या नियमानुसार ते छापले जाते.

■












# संदर्भसाहित्याची मोहिनी

पु. कृ. गर्दे

संदर्भग्रंथांच्या स्वैर चाळण्यातून (browsing) मिळणारा आनंद शब्दांत सांगणं कठीण आहे; पण ऑक्सफर्ड डिक्शनरी ऑफ क्वोटेशन्सच्या दुसऱ्या आवृत्तीचा प्रस्तावनाकार बर्नर्ड डार्विन यानं संदर्भग्रंथांच्या मोहिनीचं केलेलं वर्णन या संबंधात मला उद्‌धृत करावसं वाटतं. डार्विन म्हणतो : "वाचायला घेतल्यावर संपेपर्यंत खाली ठेववत नाही, हा अभिप्राय रहस्यकथा-कादंबऱ्यांनी काबीज केल्यासारखा झाला आहे, पण ही प्रशंसा संदर्भग्रंथांनाही तेवढीच लागू पडते. फुरसत मिळाली की चाळण्यासाठी साहित्यात त्यांच्या तोडीचं इतर काहीही नाही. एखादा संदर्भग्रंथ चाळणं हे निरभ्र दिवशी, आल्हाददायक तापहीन उन्हात हिरवळीवर बसून क्रिकेटची मॅच पाहाण्यासारखं असतं. पाहायला जाताना आपण मनाशी ठरवलेलं असतं की खेळ फक्त अर्धा तास पाहून परत जायचं, पण ठरवलेली उठण्याची वेळ झाली की वाटतं आता फक्त आणखी एक ओव्हर पाहून उठू. ती संपली की निदान नंतरची एक ओव्हर पाहून उठू. ती संपली की निदान नंतरची एक ओव्हर पाहाण्याचा अनावर मोह होतो. हे असंच चालतं, आणि पाहाता पाहाता संध्याकाळ होऊ लागते. मॅच कोणत्याच संघाच्या बाजूनं झुकत नसली, आणि ती अनिर्णित राहाणार हे स्पष्ट दिसत असलं तरी आपण थांबूनच राहातो. संदर्भग्रंथांच्या बाबतीतही हाच प्रत्यय येतो. विवक्षित मजकूर पाहाण्यासाठी आपण संदर्भग्रंथ हातात घेतलेला असतो, पण तो ज्या पानावर असतो. तिथपर्यंत आपण पोहोचतच नाही. ज्या पानावर पुस्तक सहजगत्या उघडलं जातं त्या पानावरच्या मजकुरातच आपण इतके रमतो की जो मजकूर पाहाण्यासाठी आपण पुस्तक हाती घेतलेलं असतं त्याचाच आपल्याला विसर पडतो. हीच संदर्भग्रंथांची किमया आहे. कोणत्याही पानावर संदर्भग्रंथ उघडा, मन खिळवणारा मजकूर तिथं मिळाला नाही असं कधी होणारच नाही."

संदर्भग्रंथ आणि क्रिकेट मला सारखेच प्रिय असल्यामुळे डार्विनचं मत मला मनापासून भावलं. Modern English Usage, Usage and Abusage,








Complete Plain Words, Hobson-Jobson, Hanklyn-Janklin, Brewer's Dictionary of Phrase and Fable, Oxford Dictionary of Quotations आणि तत्सम उद्धृतांचे कोष) या संदर्भग्रंथांनी वेळोवेळी माझं मन रिझवलं आहे. संदर्भग्रंथ' या वर्गात न मोडणाऱ्या पण त्यांच्याप्रमाणेच स्वैर वाचन करता येणाऱ्या anthologies देखील असाच आनंद देतात. मराठीतलं एक उदाहरण म्हणून मी विश्रब्ध शारदा'चा उल्लेख करीन.

■

**सुमंगल, अपार्टमेंट नं. ३०१, २२९१ब, मोदीबाग, पुणे ४११ ०१६.**

## विचार आणि शब्द

किती शब्द आहेत सर्वत्र! हजारो लाखो शब्द. आयुष्याच्या प्रत्येक क्षणाकरता एक शब्द आहे. प्रत्येक कृतीकरता, प्रत्येक शहाऱ्याकरता. हा सगळा गलबला केव्हा थांबणार? भाषाप्रभू त्यांच्या धडाडणाऱ्या कारखान्यांमध्ये पृथ्वीचे कोनेकोपरे धुंडाळणाऱ्या नवीन शब्दांचे अविश्रांतपणे उत्पादन करत आहेत. हे शब्द जरा शिणले, जुने झाले, दुबळे झाले की तात्काळ नवीन शब्द लढाईला सज्ज होऊन येतात.

विचारच उरलेला नाही हीच खरेतर वेदनादायक गोष्ट आहे. भाषाप्रभूंना त्यांच्या दासांचे विचार नको आहेत. विचार आले तर ते कदाचित शब्दांचे साम्राज्य नष्ट करतील; अगदी सहज, त्यांच्या निर्भेळ शांततेने. हे विचार कदाचित सर्वत्र हुकमत गाजवणारा प्रचंड तुच्छ भाव उघडकीस आणतील आणि विचारच त्याचा उच्छेद करू शकतील. मेंदूमध्ये विचारांचा जन्म होऊ शकला तर स्त्री-पुरुष ख़रेच सुंदर होतील. भाषेचे प्रभू उरणार नाहीत, पण विचारांच्या स्थानी शब्द येतात, चीत्कारतात, भुंकतात आणि विचारांचा जन्मच होऊ शकत नाही. हे शब्द धसमुसळेपणा करतात आणि राग, लोभ, आनंद यांच्या भूमिका धारण करतात. हे शब्द कडाडतात. सुन्न करतात. शब्द भीती पेरतात. हे शब्द शोषणाचे, जाणीव हरपण्याचे भय उत्पन्न करतात.

■

**(भाषाप्रभू जाँ-मारी ग्युस्ताव्ह लक्लेझिओ - भाषांतर नंदिता वागळे केल्याने भाषांतर, एप्रिल-जून २००१ पृ. ७.)**

# मराठीला पर्याय नाही!

रझिया पटेल

गेलं वर्षभर आपण इंग्रजी भाषेच्या महत्त्वाबद्दल सतत ऐकत आहोत. म्हणजे पूर्वी ऐकत नव्हतो असं नाही. इंग्रजी भाषेची थोरवी आपण अगदी ब्रिटिशांच्या काळापासून ऐकून आहोत. पण सद्य:स्थितीत इंग्रजी भाषा आत्मसात करण्याच्या मुद्याला वेगळा संदर्भ आणि वेगळे वळण मिळाले आहे असे दिसून येते आणि आता तर मराठी हा ऐच्छिक विषय करून टाकण्यात आला आहे. घ्यायचा तर घ्या नाहीतर सोडून द्या. शिवाय इयत्ता पहिलीपासून इंग्रजी हा मराठी माध्यमांच्या शाळांमध्ये कंपलसरी विषय असा सरकारी नियम लागू केला गेला. मग इंग्रजी माध्यमांच्या शाळेत पहिलीपासून मराठी असा नियम लागू केला गेलाय का? तर तसा नियम लागू केला गेलेला नाही. अर्थ सरळ आहे की माय मराठी दरिद्री आहे. आजच्या काळात आम्हांला तिचा उपयोग नाही, ती जगली काय किंवा मेली काय, आम्हांला फारशी चिंता नाही!

खरं म्हणजे मातृभाषा टिकणं, टिकवली जाणं, तिचा विकास होणं हे काळाच्या कुठल्याही टप्प्यात त्या त्या समाजाची परिपक्व आणि समर्थ होत जाण्याची निशाणी असते. आज जेव्हा मानवी समाज स्वत:च्या अस्तित्वाबद्दल, संस्कृतीबद्दल भयभीत झालेले आहेत अशा परिस्थितीत वेगवेगळ्या सामाजिक समूहांच्या अस्तित्वाचा महत्त्वाचा भाग जो मातृभाषेचा असतो, तो नष्ट होताना हे भय आणि असुरक्षितता अजूनच वाढते. मुळात मातृभाषेचा विकास हा सामाजिक समूहाच्या अस्तित्वाचा विकास असतो म्हणजे त्यामुळे अस्तित्व टिकून राहते.

समाजाच्या अस्तित्वात असलेल्या प्रत्येक गोष्टीचं अस्तित्व सापेक्ष असतं. ज्या गोष्टींचा उपयोग समाजाला आहे त्या टिकतील आणि ज्यांचा उपयोग नाही त्या काळाच्या ओघात संपून जातील. मग आज मातृभाषांच्या बाबतीत अशी स्थिती आली आहे का? तर खरे म्हणजे ती तशी आलेली नाही. त्याहीपेक्षा जास्त महत्त्वाचे

म्हणजे आजच्या परिस्थितीत समर्थ आणि संपन्न समाज निर्माण करायचा असेल तर मातृभाषेला पर्याय नाही.

आज स्पर्धेचं युग आहे आणि जागतिक स्पर्धेत आपल्याला टिकायचे असेल तर संपूर्ण समाजाला समर्थ करणं गरजेचं आहे. तळागाळांतील समाज समर्थ करणं गरजेचं आहे. तळागाळांतील समाज समर्थ बनवायचा असेल तर उत्पादक तंत्रज्ञान / शास्त्रांची माहिती खेडोपाडी पोचायला हवी आणि हे अशा प्रकारचे शिक्षण मातृभाषेतून देऊनच होऊ शकते. जीवनाची जी विभिन्न अंगे आहेत, त्या सर्व अंगांमध्ये मराठी भाषेचं जे अस्तित्व आहे ते सद्यःकाळाशी सुसंगत करत नेलं पाहिजे. मातृभाषेतून साहित्यनिर्मिती हा एक महत्त्वाचा भाग झाला; पण भाषा केवळ कथा, कादंबऱ्या, कविता आदी साहित्यांमधून टिकते आणि विकसित होत असते असे नाही तर समाजजीवनाची जी इतर क्षेत्रे आहेत त्यात विविध सामाजिकशास्त्रांच्या शाखा, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र तसेच विविध विज्ञानशाखा, खगोलशास्त्र, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, अलीकडच्या काळातील संगणकशास्त्र, माध्यमशास्त्र इत्यादी क्षेत्रांमध्ये मराठी भाषेचं अस्तित्व काय आहे, यावर मराठी भाषेची काळाशी सुसंगतता आणि उपयोगिता अवलंबून आहे. त्यातूनच मराठी भाषेचा खरा विकास होऊ शकतो.

यासाठी आपण आपला शेजारी असलेल्या चीनचेच उदाहरण पाहू. आजच्या काळात चीनने केलेली प्रगती आणि जागतिक स्पर्धेतील घोडदौड जगभर गाजते आहे. ते उदाहरण आपण पाहिले तर असे दिसून येईल की, चीनमध्ये बहुसंख्य संगणक हे चिनी बनावटीचे तर आहेतच आणि ते चिनी भाषेतच वापरले जातात. सगळ्या सॉफ्टवेअर प्रणाली या चिनी भाषेत उपलब्ध आहेत. भारतात बहुतेक इंटरनेट कनेक्शन इंग्रजीत आहेत तर चीनमध्ये चिनी भाषेत आहेत. या गोष्टीचा परिणाम काय दिसतो? चीनमध्ये अडीच कोटींच्या वर इंटरनेट कनेक्शन आहेत. चीनमध्ये व्यक्तिगत संगणकाचे उत्पादन १६३ लाख आहे तर भारतात ते फक्त ५५ लाख आहे. खरे म्हणजे चिनी भाषा ही शेकडो मुळाक्षरे, चित्रलिपीची आहे. अधिक दुर्बोध आहे. तरीदेखील चीनने ती आधुनिक युगाशी जोडून घेतलेली आहे. तिथे सर्व शास्त्र आणि कलाशाखा यामध्ये पदवी, पदव्युत्तर शिक्षण, संशोधन चिनी भाषेतच करता येऊ शकते त्यामुळे आधुनिक ज्ञान मिळविणे सर्वसामान्य माणसाला सोपे होते. त्याउलट आपल्याकडे मराठी भाषा इतकी लवचिक असूनही आपण आधुनिक ज्ञानाशी तिला जोडून घेतलेले नाही. अजूनही विज्ञानशाखेत पदवी

आणि पदव्युत्तर शिक्षण मराठीत घेता येत नाही. आपल्याकडे सरकारने काही परिभाषा कोश समित्या स्थापन केल्या होत्या. आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान परिभाषा कोश निर्मितीचे काम या समित्यांवर सोपवण्यात आले होते पण अजूनही या परिभाषा महाविद्यालये आणि विद्यापीठे यांच्यापर्यंत पोचलेल्या दिसत नाहीत.

एकीकडे आपण म्हणतो आहोत की जागतिक अर्थव्यवस्थेने आपल्यापुढे जे आव्हान उभे केले आहे त्यात टिकून राहायचे असले तर इंग्रजीशिवाय पर्याय नाही, पण जी प्रगत राष्ट्रे आहेत आणि जी आजही ठामपणे या स्पर्धेत उभी आहेत अशा राष्ट्रांकडे आपण पाहिले तर काय दिसते? वर मी चीनचे उदाहरण दिलेच आहे. शिवाय जपान, जर्मनी या देशांकडे आपण पाहिले तर असे दिसते की, त्यांनी या स्पर्धेत स्वभाषेच्या आधारावर आपले स्थान आधी पक्के केले आणि मग ते इंग्रजीकडे वळलेले आहेत. जर्मनीतील सर्वसामान्य शेतकरी, त्यांची मुलं शेतीसाठी आणि एकूणच वापरातील तंत्रज्ञान सहजपणे वापरू शकतात कारण तिथे यंत्रज्ञान जर्मन भाषेतून उपलब्ध आहे.

याउलट आपण आज काय करतो आहोत. विज्ञान-तंत्रज्ञान मराठी भाषेत आणणे तर सोडाच आपण मराठी भाषाच सोडून द्यायला निघालो आहोत आणि इंग्रजी शिकवतानाही ती ज्ञानभाषा म्हणून शिकण्यापेक्षा संवादभाषा म्हणून शिकण्यावर जास्त भर देतो आहोत. म्हणजे जागतिक स्पर्धेत टिकून राहण्यासाठी जे ज्ञान आणि उद्योग यांबाबतीत समर्थ होण्याची गरज आहे; त्याकडे दुर्लक्ष करत आहोत. संपूर्ण समाज याबाबतीत संपन्न आणि समर्थ व्हायचा असेल तर हे आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान मराठी भाषेत वा मातृभाषेत आणले गेले पाहिजे आणि त्याद्वारे ते सर्वसामान्य माणसापर्यंत पोचले पाहिजे. व्यावसायिक दृष्टी असलेल्या संगणक शिक्षणसंस्थांनी जेव्हा हे पाहिले की फक्त इंग्रजी भाषेचा आधार घेतला तर मिळणारा प्रतिसाद अल्पच राहील. तेव्हा संगणकशास्त्र आणि संगणक शिक्षणासंबंधीची मराठी भाषेतील पुस्तके उपलब्ध करून देण्याचे पाऊल त्यांनी टाकले. हे व्यापारी दृष्टीने झाले पण आपला इतिहास असे सांगतो की त्या काळातील सर्वोच्च ज्ञान जे भगवद्‌गीता जनसामान्यांसाठी संत ज्ञानेश्वरांनी मराठीत आणून खळबळ माजवून दिली. त्याचप्रमाणे सर्वोच्च व आधुनिक ज्ञान आम जनतेसाठी मराठी भाषेत आणण्याचा आक्रमक प्रयत्न आपल्याला करावा लागणार आहे आणि तसे केले तरच सर्वसामान्यांचा आणि पर्यायाने महाराष्ट्राचा विकास होऊ शकेल.

आजच्या काळात वसाहतवाद वेगळ्या स्वरूपात येतो आहे. त्याचे तिसऱ्या जगावरचे आक्रमण जास्त भयानक आहे. त्याचे स्वरूप भाषांच्या संदर्भात स्पष्टपणे दिसते ते असे की जगातील एकूण भाषांपैकी दोन टक्के भाषा दरवर्षी नष्ट होतात. १९०० साली जिवंत असलेल्या दहा हजार भाषांपैकी आज फक्त सहा हजार सातशे भाषा अधिकृतपणे शिकविल्या जातात. जेव्हा भाषा अशा मरण पावत आहेत तेव्हा साहजिकच त्या भाषेतील ज्ञान, इतिहास संस्कृती हेही त्यासोबत संपून जात असते. जेव्हा या स्थानिक भाषा मरत आहेत त्याच काळात काही मोजक्या भाषांचे वर्चस्व मात्र वाढत चालले आहे. अशा परिस्थितीत साम्राज्यवादी भाषा आणि त्या भाषांमधून दिले जाणारे ज्ञान एवढेच फक्त उपलब्ध असेल आणि त्यावरचे अवलंबित्वही वाढेल. एकूण तिसऱ्या जगाची पुन्हा गुलामगिरीकडे वाटचाल सुरू झालेली असेल. म्हणजे शोषितांनी लढा देऊन, आत्मबलिदानाची किंमत चुकवून मिळविलेली स्वातंत्र्य, समता, बंधुता ही मूल्ये फोल ठरवण्याचा धोका निर्माण होईल.

यात आणखी एक महत्त्वाचा मुद्दा आहे तो असा की, जेव्हा जगाच्या स्पर्धेत आपल्याला एक समर्थ राष्ट्र म्हणून उभे राहायचे असेल तर त्याची सुरुवात मातृभाषेतूनच होत असते. जर तुम्ही तुमची मातृभाषादेखील नीट बोलू शकत नसाल तर तुम्ही देशाची सेवा तरी कशी करू शकणार? आपल्या देशातील सर्वसामान्य माणसाशी मातृभाषेत संवाद साधणेही कठीण होऊन बसेल. अगदी सर्वसामान्य माणसालादेखील आम्ही इंग्रजी शिकवू असा पण केला तरी त्यासाठी काही पिढ्या जाव्या लागतील शिवाय फक्त इंग्रजी शिकून समाज सबळ होतो का? हाही प्रश्नच आहे. इंग्रजी भाषेत शिकलेले आणि इंग्रजी भाषा न येणारे ही जी नवीन वर्णव्यवस्था निर्माण झाली आहे ती संपवायची असेल तरी पर्याय मातृभाषेचाच आहे.

त्यामुळे सामाजिक, सांस्कृतिक विषमता संपवणे आणि जागतिक स्पर्धेत उभे राहणे या दोन्ही गोष्टींवर उपाय शोधताना मातृभाषा नाकारणे हा उपाय असू शकत नाही तर मातृभाषेचा आधुनिक काळाशी सुसंगत विकास हा त्यावरचा उपाय आहे. त्यायोगेच समाजाला अधिक संपन्न अधिक समर्थ बनवता येते.

■

**पी-१७ सुयोग हाईटस्, रामबाग कॉलनी, पौड रोड, पुणे ४११ ०३८.**

**(पूर्व प्रसिद्धी : थिंकर्स ॲकॅडमी जरनल नोव्हें. डिसें. २००१, पृ. १८-२०)**



अनुक्रमणिका

## साद आणि प्रतिसाद

# प्रतिक्रियांविषयीची प्रतिक्रिया

**मो. गो. धडफळे**

'भाषा व जीवन' या त्रैमासिक पत्रिकेच्या वर्ष १९ अंक ४ मध्ये लिहिलेल्या 'दहा न् आठ अठरा' या माझ्या लेखाचा मुख्य उद्देश आर्य गणनापद्धती ही 'दशमाना'ची तर द्राविडांची 'अष्टका'ची होती हे सांगणे एवढाच होता. आजची भारतीय संस्कृती ही प्रामुख्याने आर्य - द्रविड या रसायनाने तयार झाली असल्याने १० + ८ = १८ या बेरजेच्या आकड्याला आलेले महत्त्व हेही मी उदाहरणांसह थोड्या ललित शैलीत वाचकांपुढे मांडले. पुस्ती म्हणून ऑस्ट्रिक विंशतिमानाचाही मी उल्लेख केला व प्रसंगोपात्त (तिरु) 'श्री', 'छपन्न', चौदावे 'रत्न' 'अब्ज' या शब्दांची व वाक्प्रयोगांची चर्चा केली.

मला या गोष्टीचा विलक्षण आनंद झाला की डॉ. स.ह. देशपांडे प्रभृति थोर पंडितांनी माझा लेख काळजीपूर्वक वाचला, त्यातील काही प्रमादांचे दिग्दर्शन केले आणि अर्थातच योग्य ते कौतुकही केले. एकूण चार विद्वानांनी या लेखाची लेखी प्रतिक्रिया पाठवून दखल घेतली. पैकी मा. प्राध्यापक श्री. मनोहर राईलकर यांनी 'साद' देऊन निखळ कौतुक केले व श्री. म.ना. गोगटे यांनी त्यांना 'साथ' दिली. श्री. गोगटे यांनी प्रत्यक्ष भेट घेऊनही कौतुक केले. त्या वेळी थोडी चर्चाही झाली. "चौदावे रत्न दाखवायचे म्हणजे तरी काय?" हे माझ्या लेखातले वाक्य मला खरोखरीच पडलेला प्रश्न नसून प्रश्नोत्तर-शैलीत विवेचन करण्याचा भाग आहे हे मी त्यांना सांगितले व त्यांना ते पटले. त्यांच्या गुरुजींनी 'चाम्बुधेः' याचा 'चाबूक'शी संबंध जोडून दाखविला, हा जुन्या पठडीतल्या शिक्षकांचा नर्मविनोदी चतुराईचाच भाग आहे. हल्ली मुंज झालेल्यांच्याही गळ्यात सतत जानवे नसते. पूजाप्रसंगी 'जाऊन' 'नव्याने' घेऊन यायला लागते म्हणून तर ते 'जा नवे' ठरते असा उपरोधपूर्ण विनोद माझेही गुरुजी करत असत.

श्री. राईलकर व श्री. गोगटे यांचा मी आभारी आहे.

मला अप्रूप वाटले डॉ. स. ह. देशपांडे यांच्या लेखाचे. त्यांच्या सौजन्याला धरून 'पत्रिके'कडे पाठविलेल्या त्यांच्या सुवाच्य अक्षरातील लेखाची प्रत मला आगाऊ-माहितीसाठी त्यांनी रवाना केली एवढेच नाही तर त्याही नंतर आवर्जून संपादकांना व मला त्या मजकुरात अनवधानाने लिहिलेले एक वाक्य गाळावे अशी सूचनाही केली. लेख-मुद्रणाविषयी केवढी सावधानता असायला हवी हे यामुळे कळले. मीही जर माझेच हस्तलिखित मुद्रणास देण्यापूर्वी शांतपणे तपासून दिले असते तर 'परार्धात एकवर 'अठरा' शून्ये' असे प्रामादिक लेखन माझ्याकडून टळले असते व एकावर १७ शून्ये असणारी परार्ध ही सर्वांत मोठी संख्या अठरा आकड्यांची आहे असे योग्य विधान माझ्याकडून झाले असते. माझी ही चूक दाखवून दिल्याबद्दल मी 'स. हं' चा ऋणी आहे. त्यांना अशीही विनंती करतो की त्यांच्या वाचनात आलेल्या माझ्या लेखनातील चुका सरळ उघड कराव्यात, यात कोणतेही औचित्यभंग मी समजणार नाहीच उलट आभारीच राहीन. सॅन सरीन यांच्या लेखाआधी कैक वर्षे (१९५८) 'संकेत-कोश' प्रसिद्ध झाला, हे मला माहीत आहे व मान्य आहे. नुकत्याच वाचलेल्या सरीनच्या लेखाचा मी निर्देश केला एवढेच. 'संकेतकोशा'चा व्हावा तसा मानसन्मान झाला नाही व तो बऱ्याच अंशी दुर्लक्षित राहिला ह्या मताशी मी पूर्ण सहमत आहे. सॅन सरीन हा फ्रान्समध्ये स्थायी झालेला पौरस्त्य तरुण विद्वान आहे. My learned friend असे इंग्रजीत म्हणतात. तसाच मी त्याचा उल्लेख मराठीत माझे 'विद्वान स्नेही' असा केला. या पलीकडे खरे तर काहीच नाही! पण का कोणास ठाऊक माझा हा उल्लेख उदार वृत्तींच्या 'सहं'ना सहन झाला नाही. त्यांनी माझ्या निर्देशाचा खोचदार उल्लेख केला. कदाचित तो त्यांच्या विशिष्ट शैलीचा आविष्कार असेल एवढेच!

'छपन्न' विषयी माझ्या मनात काहीच संदेह नाही. मी 'छपन्न' विषयावरील प्रा. निपाणीकरांचा लेख वाचला आहे. मुंबई मराठी साहित्य संघाच्या पत्रिकेत तो आला होता. संस्कृत 'षट्-प्रज्ञ'चे प्राकृतात 'छपण्ण-छप्पन्न' असे रूप होते. प्राकृतातील याविषयीची स्पष्टीकरणे विस्तार - भयास्तव न देता केवळ संस्कृत श्लोक उद्धृत करतो.

"धर्मार्थकाममोक्षेषु लोकतत्त्वार्थयोरपि ।
षट्सु प्रज्ञा तु यस्यासौ षट्प्रज्ञः परिकीर्तितः" ॥

श्लोक एवढा प्रसिद्ध आहे की वा. शि. आपट्यांच्या संक्षिप्त संस्कृत-आंग्ल कोशातही हे अवतरण सापडेल.

यानंतर मात्र माझ्या लेखाला 'प्रतिसाद' म्हणून व पूरक म्हणून जी माहिती माझ्यासारख्या वाचकाला सहजासहजी अजिबातच प्राप्त झाली नसती अशी अतिशय मोलाची माहिती डॉ. स.ह. देशपांडे यांनी देऊन माझ्यासारख्यांना उपकृत केले आहे. ते अर्थशास्त्राचे गाढे अभ्यासक आहेत. 'गणन-सामर्थ्य' वगैरे अर्थशास्त्राच्या ज्ञानशाखा मला ऐकूनही ठाऊक नाहीत त्यात ते पारंगत आहेत. Plenty, heap या शब्दकल्पनांपासून मागोवा घेत, 'पाचुंदा', 'पाच विसा', ॲझ्टेटिक जमातीत रूढ असलेला पाच दिवसांचा आठवडा, 'फूट', 'मीटर', 'गोचर्मा'चे वैदिक साहित्यातील उल्लेख या त्यांच्या सगळ्या विद्वत्तापूर्ण विवेचनाने छाती दडपून जाते. गोचर्मविषयक त्यांच्या लेखाचे मराठीत त्यांनीच भाषांतर केले तर फार बरे होईल. 'गण', 'कटपयादि' हा भाग मलाही काहीसा माहीत होता पण माझ्या 'आर्य-द्राविड' गणना पद्धतीविषयक लेखात मला तो आणावासा वाटला नाही. असो. मी दोषदर्शनाबाबत, दिग्दर्शनाबाबत व प्रोत्साहनाबाबत ज्ञान व वयाने वडीलकीचा मान असणाऱ्या डॉ. स. ह. देशपांडे यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

यानंतर माझ्या केवळ या लेखाविषयीच नव्हे तर माझ्या इतरत्र झालेल्या लेखनाचेही स्नेहाने वाचन करून त्यावर सूक्ष्म, साक्षेपी टिपण ठेवून आवर्जून लिहिणारे थोर भाषाकोविद डॉ. म. अ. मेहेंदळे यांनीही माझ्या काही लेखांचा परामर्श घेतला आहे.

'साहित्य' हा शब्द मी वैदिक व रामायणादी प्राचीन वाङ्मयाचा जो 'संहिता' म्हणून उल्लेख येतो त्याच्याशी जोडतो. तेच मला योग्य वाटते. या विषयाची मी 'विद्वत्तापूर्ण चर्चा' केल्याचे डॉ. मेहेंदळे म्हणतात पण अखेरीस त्याचे खंडन न करताच "मला स्वतःला संस्कृत काव्यशास्त्रकारांनी केलेला साहित्य शब्दाचा खुलासा रुचतो". (पृ.३३) असे म्हणतात. याला काय उत्तर देणार? डॉ. मेहेंदळ्यांची रुची मी नोंदवतो. 'सहित व संहित' हे विकल्प ठरतात एवढेच मला, माझ्या डोळ्यांसमोर असणाऱ्या संस्कृतची फार जाण नसणाऱ्या वाचकांना सांगावयाचे होते व त्यांसाठी उद्‌धृत केलेले 'श्लोकवार्तिक' मला पुरेसे वाटले व अजूनही वाटते. पृ. ३२ व ३३ वर जी पांडित्यपूर्ण चर्चा डॉ. मेहेंदळे यांनी केली आहे ती कदाचित मी 'संस्कृत' या विषयाच्या सखोल अभ्यासाला वाहिलेल्या कालिकात केलीही असती; पण त्याने माझ्या अंतिम प्रतिपाद्याबाबत काहीही फारसा फरक पडणार नाही. शब्द व अर्थ यांचा सहितपणा हा केवळ संस्कृत व प्राकृत

वाङ्मयापुरताच नाही. सर्वच जागतिक साहित्यात तो असतो. 'संहिता' ही मात्र खास भारतीय धारणा व भारतीय वाङ्मयाचे ऐतिहासिक रूप आहे. म्हणून संहित-सहित-साहित्य ही नवी कल्पना मी मांडली. नवा विचार पचनी पडायला कदाचित काही अधिक काळ जाणे आवश्यक आहे.

कला हा शब्द कॅलिग्राफी, कॅलिस्थेनिक्स, कल्याण इत्यादी अनेक शब्दांशी अर्थदृष्ट्या संबंधित आहे व त्याचा युरोभारतीय उत्प्रेक्षित *Kel (quel) याच्याशी संबंध आहे हे मी सविस्तर दाखवले आहे. त्यापासून तयार होणारा 'कल्य'हा शब्द मिलिन्दप्रश्नात नागसेनाच्या दर उत्तरागणिक प्रशस्ती म्हणून आला आहे. "कल्लोऽसि, भन्ते नागसेन" येथे 'कल्य' याचा अर्थ 'पहाटकाळचा', 'न्याहारी', 'क्षुल्लक बाब' असा अजिबातच करता येणार नाही. मायरहोफरचा कोश हा न पाहता शब्दार्थचर्चेविषयी मी कधीच लेखन करीत नाही. आता डॉ. मेहेंदळे यांनी माझ्या प्रतिपादनाच्या निमित्ताने त्यातील काही भाग उद्धृत केला तर मला हरकत घेण्याचे कारण नाही. तेवढा भाग मला अनभिप्रेत नाही एवढेच म्हणेन.

मी मृच्छकटिक सुमारे १५ वेळा शिकवले आहे. 'अर्थकल्यवर्त' चे सर्व संदर्भ पाहिलेत. त्यांचे दोन भाग करायला हवेत. पहिल्या भागात पहिल्या अंकातील एक वाक्य व दुसऱ्या भागात इतरत्र झालेला त्या शब्दाचा वापर. यात अर्थदृष्ट्या परस्पर विरुद्धता आहे. 'अर्थकल्यवर्त' याचा 'न्याहरी' (मुख्य जेवणाच्या तुलनेत लहान, कमी, क्षुद्र) an unsubstantial thing, a bagatelle, a trifle हा अर्थ स्त्री-कल्यवर्त इत्यादी दुसऱ्या विभागातील शब्दांबाबत जुळतो पण 'एते अर्थकल्यवर्ता यत्र यत्र न खाद्यन्ते तत्र तत्र गच्छन्ति' या पहिल्या अंकातल्या वाक्यात 'हे क्षुद्र, मामुली धन जेथे खाल्ले जात नाही तेथे जाते' हा अर्थ डॉ. मेहेंदळे यांना कदाचित रुचेलही; मला पटत नाही. 'जिथे खाल्ले जात नाही तेथे रगड संपत्ती जाते' असेच मैत्रेयाला म्हणायचे असणार. भाषेत कालांतराने शब्दांना निरनिराळ्या कारणांमुळे उलटसुलट अर्थ प्राप्त होतात. उदा. आराद् म्ह. दूर व समीप (सापेक्षतेने), परोक्ष (सं) = अपरोक्ष (मराठी), अ.-रिष्ट (वैदिक - भरपूर, समृद्धी), मराठीत मात्र 'आफत' असा अर्थ झाला आहे. असो.

■

**'यशोदीप' - ब, ज्ञानमंगल कार्यालयाजवळ, सदाशिव पेट, पुणे ४११ ०३०.**

# एक साद

मनोहर राईलकर

वर्ष २०, अंक १ ने प्रतिसाद देण्याकरता मला भरपूर खाद्य पुरवलं आहे असं लक्षात आलं. एकेकाचा समाचार घेऊ.

**एक** – पृ. १४ वरील, श्री. ना. शं. आपटे यांचा देवनागरी अक्षरे पुनर्विचार, पुनर्रचना, आधी पाहू. देवनागरी अक्षरांची पुनर्रचना करण्याची आवश्यकता का आहे हे सांगण्याकरता त्यांनी केलेली तीन विधाने महत्त्वाची आहेत.

अ) विकसनशील अक्षरांचा .... विशेषतः **अक्षरांची संख्या कमी होणे.** (पृ. १४ परि. १)

आ) अख्ख्या किंवा अर्धवट .... **अजोड अद्वितीय दोषपण ठरली आहे.** (पृ. १५ परि. २)

इ) त्यांमुळे .... **२५०/३०० किंवा अधिक अक्षरे** वापरावी लागत आहेत. (पृ. १५ परि. ३)

(सर्वत्र ठळक टाईप माझा.)

वर मांडलेल्या (इ) मुद्याचा विचार करू. श्री आपटे म्हणतात देवनागरी अक्षरांची संख्या २५०/३०० आहे. पण ती संख्या ह्या मर्यादेमध्ये बसणारी नाही. श्री किंजवडेकरशास्त्रींच्या मराठी लघुसिद्धांतकौमुदीमध्ये दिलेल्या जोडाक्षरांची संख्या ३२१ आहे. (चित्रशाळा प्रकाशन १९३४). इतकी सारी जोडाक्षरं वापरातच नसतात असंही नाही. कारण किंजवडेकरशास्त्रींनी प्रत्येकाचं एकेक उदाहरणच दिलं आहे. शिवाय ही यादी परिपूर्ण आहे असंही नाही. कारण त्यात चार अक्षरी जोडाक्षरांचा अंतर्भाव नाही. (उदाहरणार्थ धाष्टर्य शब्दाच्या जोडाक्षरात चार अक्षरं आहेत. कार्त्स्न्यं शब्दात पाच!) तर, ही ३२१ अधिक मूळची (संस्कृतातली) शुद्ध ३३ व्यंजन या सर्वांच्या तेरा/चौदाखडया करण्याकरता जवळ जवळ **पाच हजार** प्रकारची अक्षरं लागतील! (हे झालं तीन अक्षरी जोडाक्षरांपर्यंत, पण चार किंवा पाच अक्षरी जोडाक्षरं घेतली तर!) सांगण्याचा उद्देश, देवनागरी अक्षरांची संख्या.

श्री आपट्यांनी दिलेल्या २५०/३०० च्या मर्यादेत मुळीच बसत नाही. पण, माझ्या मते श्री आपटे म्हणतात, त्याप्रमाणं अक्षराची संख्या कमी होण्याची मुळीच गरज नाही. माझ्या ह्या म्हणण्याचा उलगडा लवकरच होईल.

म्हणजे, एका परीनं वर उल्लेखिलेल्या (अ) आणि (आ) मधील त्यांचा विचारच मी उचलून धरला आहे असं सकृतदर्शनी वाटू शकेल. पण पुनर्विचाराची दिशा सूचित करताना सध्या उपलब्ध असलेले टंकलेखकाचे (टाइपरायटर) कळफलक किंवा लेटर-प्रेसकरता उपलब्ध असलेले टंक तेवढेच श्री आपट्यांनी लक्षात घेतले असावेत आणि संगणकांच्या अफाट शक्तीचा विचार त्यांनी केला नसावा, असं वाटतं. कारण, टंकलेखकाला फार, म्हणजे फारच मर्यादा असली, लेटरप्रेसची मर्यादा काहीशी त्या पलीकडे असली आणि संगणकाला किंवा संगणकानं संदेश पाठवण्याकरतासुद्धा जरी इतक्या प्रचंड संख्येनं विभिन्न अक्षरांची/चिन्हांची जरुरी असली तरी, प्रत्यक्ष तेवढ्या **स्वतंत्र कळींची जरुरी नसते.** संगणकाची स्वतःची अशी काही तर्कपद्धती (computer logic) असते आणि काही संकेत (इस्कीकोड) असतात. थक्क व्हावं असे, अक्षरशः काय वाटेल ते बदल त्यांच्या मदतीनं देवनागरी अक्षरात करता येतात. पुढं काही उदाहरणं दिली आहेत, शिवाय, ह्या प्रकारांना व्यवहारतः अंत नाही, इतके, असंख्य प्रकार शक्य आहेत.

१) टंकलेखकावर त्र करण्याकरता ्र असं वेगळं चिन्ह लागतं. त्यामुळं वेगळी कळही लागते. (हेच चिन्ह ऋ करताही वापरता येतं. ही एक सोय आहेच.) पण संगणकाला मूळातच त्या वेगळ्या चिन्हाची आवश्यकता नसते. त त ् र, ह्या क्रमानं कळी दाबल्या की अंतर्गत तर्कपद्धतीमुळं त्र अक्षर तयार होतं. (येथे ् चिन्हाचा अर्थ पाय मोडण्याची कळ.) आणि पाय मोडण्याकरता असलेल्या कळीचा उपयोग फक्त इथचं होतो असं नव्हे तर त्या कळीचा उपयोग सर्वत्रच, कोणत्याही जोडाक्षराकरता होतो. धाष्ट्यर्मधील जोडाक्षर मिळवण्याकरता र ् ष ् ट ् य ह्या क्रमानं टंकन केलं की झालं. इथं तीन वेळा पाय मोडावा लागला आहे. या सोयीमुळं जोडाक्षरांचे ५००० (किंवा मुळात किंजवडेकरशास्त्रींनी दिलेले ३२१ प्रकारसुद्धा) लागत नाहीत. पाय मोडण्याची एकमेव कळ पुरेशी आहे. तिच्यामुळं सर्व साध्य होतं. परिणामी, जसजसा संगणकाचा वापर लेखनात वाढत जाईल तसतसे टंकलेखक कालबाह्य होऊन नष्ट (प्राय)च होतील. सध्या तरी ते त्या मार्गावरच आहेत.

मराठीत क्ष आणि ज्ञ ही अक्षरं मानली जातात. संस्कृतात ती जोडाक्षरं आहेत.

संगणकाला ती स्वतंत्रही करता येतात किंवा क ् ष आणि ज ् ञ ह्या क्रमानं मिळवता येतात.

२) ऱ्हस्व वेलांटी द्यायची असेल तर टंकलेखकावर ती आधी टंकित करून घ्यावी लागते. लेटर-प्रेसवरही ती आधी जुळवावी लागते. तसं संगणकावर करावं लागत नाही. ज्या अक्षराला ऱ्हस्व वेलांटी द्यायची आहे, ते अक्षर **आधी** टंकित करून मग ऱ्हस्व इकाराची कळ दाबली की ती अक्षराच्या मागील बाजूस आपण होऊन जाऊन बसते. म्हणजे क ि अशा क्रमानं कळी दाबल्या की कि हे अक्षर तयार होतं. **स्त्रि**या ह्यातील स्त्रि हे अक्षर टंकलेखकावर किंवा लेटर-प्रेसवर करण्याकरता आधी ऱ्हस्व इकाराची वेलांटी ि, अर्धा स्, त्र ह्या क्रमानं जावं लागेल. पण, संगणकाला याची जरुरी नाही. पुढील क्रमानं टाईप केल्यावर स्त्रि हेअक्षर तयार होतं, स ् त ् र ि. आणि एकापाठोपाठ अनेक कळी दाबण्याच्या सुविधेमुळे अक्षरशः असंख्य, लक्षावधी, नव्हे कोट्यावधी अक्षरं तयार होऊ शकतात. कशी ते पुढं दिलं आहे.

वेलांटीची आडवी रुंदीही अक्षराच्या किंवा जोडाक्षराच्या गरजेनुसार कमी जास्त ठेवता येते. हे स्त्रिया आणि किंवा ह्या शब्दांचं निरीक्षण केल्यावर ध्यानात येईल. त्यासाठीही वेगळ्या कळींची जरुरी नसते.

३) ट्ट असंही अक्षर करता येतं किंवा ट्ट असंही करता येतं. ठ्ठ करता येतं, तसंच ड्ड सुद्धा करता येतं. ही सोय अर्थातच टंकलेखकावर अधिक कळीचा वापर केल्याशिवाय करणं शक्यच नाही. संगणकानं क्त असंही अक्षर मिळू शकतं किंवा क्त असंही. श्री सुद्धा करता येतं आणि श्री सुद्धा. त्र तर येतंच पण, काहींना अपेक्षित असलेलं त्र असंही अक्षर करता येतं. द्य, द्‌य आणि द्य, हे सर्व प्रकार येतात. शिवाय, टंकलेखकाला अक्षरांचा प्रकार (फॉंट) बदलणं शक्य होत नाही, इटॅलिक, ठळक, अधोरेखन, अक्षरांचाा आकार, वगैरे हवे तसे बदल करून घेता येत नाहीत. पण संगणकाला हे आणि आणखी कितीतरी प्रकार साधता येतात.

४) देवनागरीत र च्या जोडाक्षरांची कितीतरी रूपं आहेत. हर्ष, राष्ट्र, क्रम, त्रास, ऱ्हास, ह्रास, श्री इत्यादी. तेवढे सगळे संगणकाला सहज साधता येतात. आणि वेगवेगळ्या प्रकारच्या अर्ध्या र साठी वेगवेगळ्या कळी लागत नाहीत. कोणत्या क्रमानं उपलब्ध कळी दाबायच्या हे समजून घेतलं की झालं. शिवाय, देवनागरीकरता संगणक वापरण्याकरता काही फार मोठ्या कौशल्याचीही आवश्यकता नसते. आणखी एक सर्व भारतीय लिप्यांमधील समान सूत्र लक्षात घेतल्यास एका लिपीत

लिहिलेला मजकूर निमिषार्धात दुसऱ्या लिपीत नेता येतो. तसा तो यावा असं सॉफ्टवेअर सीडॅकनं बनवलं आहेच. त्यामुळं दुसरी लिपी शिकल्याशिवाय, भारतीय भाषा शिकण्याचं एक फार मोठं साधन उपलब्ध झालं आहे, हा लाभ वेगळाच.

संगणकावर मुख्य ४६ इतक्याच कळी असतात आणि शिफ्टमुळं आणखी तेवढ्याच कळी मिळतात. म्हणजे एकूण ९२. पण अक्षरं नसलेल्या, म्हणजे अंक, विरामचिन्हे, पाय मोडणे, इ. देणाऱ्या जास्तीत जास्त सुमारे ४० सोडल्या तरी ५२ कळी उरतात. शिवाय, त्यावर असलेल्या काही सहायक कळींमुळं (कंट्रोल, आल्ट इ.) आणखीही कितीतरी प्रकार साधता येतात. उपलब्ध ५२ मुख्य कळींपैकी कोणत्याही चारच कळी दाबून करायचे प्रकार मोजले तर त्यांची संख्या ५२चा चवथा घात म्हणजे सुमारे पाऊण कोटी (७३,११,६१६) इतके प्रकार साधता येतात. यातले काही अडचणीचे म्हणून सोडून दिले तरी उरलेली संख्या इतकी प्रचंड आहे की, तिच्यापुढं देवनागरी अक्षरांच्या ५,००० नानाविध प्रकारांची गरज नगण्यच ठरावी. ह्या प्रकारांत ॐ आहे आणि ऽ हे अवग्रह चिन्हही आहे! तद्वतच, ॲ आणि ऑ सुद्धा आहेत.

तेव्हा पुनर्विचार करायचाच असेल तर, टंकलेखकाच्या मर्यादेत अक्षरं कोंबण्याकरता म्हणून पूर्वी जे वेडेवाकडे आकार स्वीकारून हवी तशी (की नको तशी?) मोडतोड करून आपण देवनागरीचा जो डौल घालवला आहे तो संगणकाची अफाट शक्ती वापरून पुन्हा संपादण्याकरता काही सुचवता आलं तर जरूर सुचवावं, असं मला वाटतं. (टंकलेखकावर टंकित केलेला मराठी मजकूर पाहवत नाही, इतका ओबडधोबड आणि ओंगळ असतो). नाही तरी डॉ. कल्याण काळ्यांनी श्रीकेक्षींची ही व्यथा आपल्या लेखात (२०-१ याच अंकात श्रीकेक्षींची भाषाहितैक दृष्टी पृ. २४ परि. २) व्यक्त केलीच आहे. (त्या लेखानुसार) श्रीकेक्षी म्हणतात -

आपली पारंपारिक बाळबोध लिपी ही शास्त्रशुद्ध आहे. पण जुळाऱ्यांसाठी, टंकयंत्राच्याा सोईसाठी आपल्याला तिची अडचण भासू लागली आहे. जोडाक्षरे तोडून पाय मोडकी करणे, त्यांची आगगाडीसारखी रांग लावणे इ. प्रकार अनिष्ट असून त्याने आपल्या लिपीचे सौंदर्य नष्ट होत आहे.

ओघातच, आणखी दोन संबंधित मुद्देही सांगून टाकतो.

५) प्रारंभी देवनागरीकरता जेव्हा केव्हा टंकलेखक तयार करण्यात आले. तेव्हा निरनिराळ्या मंडळींनी निरनिराळे कळफलक तयार केले. त्यामुळं एका प्रकारचा कळफलक वापरण्याची सवय असलेल्या टंकलेखनिकाला (टायपिस्ट)

दुसऱ्या प्रकारचा फलक वापरताना त्रास होत असे. निदान, त्याची गती तरी मंदावत असे. आजही निरनिराळ्या मंडळींनी संगणकावर देवनागरी बसवण्याकरता कळफलकांच्या निरनिराळ्या रचनांचा अवलंब केला आहे. पण त्यामुळं काहीच बिघडत नाही. कारण, आपले सॉफ्टवेअर कोणतेही असले तरी संपूर्ण कळफलकच आपल्या सवयीनुसार पाहिजे तसा बदलून घेण्याची सोय संगणकात उपलब्ध असते! इतकंच काय पण वेगवेगळ्या पद्धतीत टंकित केलेलं लिखाण आपल्या पद्धतीत बदलून घेण्याचं तंत्रही आज काहींनी विकसित केलं आहे. (माझ्या माहितीचे श्री कानडे - प्रिया इन्फॉर्मेटिक्स यांनी परिवर्तन या नावानं असं सॉफ्टवेअर बनवलं आहे आणि ते आज वापरात असून मीही त्याचा उपयोग केला आहे.)

६) वरील ५ सारखा दुसरा मुद्दा. अक्षरक्रमानं यादी करण्याचं एक फार मोठं काम संशोधकांना करावं लागतं. संदर्भ ग्रंथांची यादी देणं, कोश तयार करणं, वगैरे. फार मोठ्या कटकटीचं काम असतं, ज्यांनी ते केलं आहे, त्यांनाच कळेल. इंग्रजीच्या अशा कामाकरता संगणकावर सोय उपलब्ध आहे. त्याला सॉर्टिंग म्हणतात. (हे काम संगणकावर किती वेगानं होतं याची यापूर्वी मला तरी कल्पना नव्हती पण प्रत्येकी वीस अक्षरांची इंग्रजीतील ५ हजार नावं क्रमांन लावायला संगणकाला अर्धा सेकंदही लागला नाही!) पण देवनागरीकरता ही सोय अद्याप नव्हती. तीही वर उल्लेखिलेल्या श्री कानडे यांनी केलीच आहे. इतकेच काय पण कोणत्या क्रमानं अक्षरं घ्यायची याबद्दल विद्वानांत एकमत न झाल्यास जी संभाव्य अडचण एरवी उद्‌भवण्याचा संभव आहे, तिचाही निरास त्यांनी केला आहे. ॲ हे अक्षर ए च्या आधी घ्यायचं की नंतर? संगणक म्हणतो तुम्हाला कसं हवं आहे, तसा बदल तुमचा तुम्हीच आपापल्या मर्जीनुसार चटकन करून घेऊ शकता.

**दोन** - डॉ. म.अ. मेहेंदळे यांच्या लेखावर विचार करताना माझ्या मनात आलेले विचार मांडतो. लेखाच्या २.१ (पृ. ३३) ह्या छेदिकेत एकविसावे शतक किंवा तिसरे सहस्रक ह्यावर त्यांनी आपले विचार मांडले आहेत. एकविसावे शतक केव्हा सुरू होते याबद्दल गणित्यांच्या मनात कसलाच गोंधळ नव्हता आणि नाहीही. पण हा गोंधळ, स्वार्थामुळं असेल, निर्मिती उद्योग किंवा व्यापाऱ्यांनी सुरू केला. १.१.२०००ची पर्वणी (?) साधून तर त्यांनी आपला माल खपवला आणि १.१.२००१ चीही पर्वणी साधली. त्यामुळं सर्वसाधारण व्यक्तींचा गोंधळ झाला. मला १.१.२००० च्या सुमारास नव्या सहस्रकाच्या म्हणून अनेक परिचितांकडून शुभेच्छा आल्या. 'तुमच्या शुभेच्छा मी एक वर्षानं स्वीकारतो', असं मी त्यांना

गमतीनं उलट टपाली कळवलंही.

सकाळमध्ये लिहिलेल्या 'त्या' (तथाकथित जाणकार) पत्रकाराला, 'शास्त्रदृष्ट्या हे म्हणणे योग्य असल्याचे' प्रशस्तिपत्रक देऊन डॉ. मेहेंदळ्यांनी, आणखी गोंधळ केला आहे. त्याचा विचार तूर्तास करू. कारण, त्या पत्रलेखकाचं म्हणणं. निखालस चूकिचं आहे. याचा उलगडा (करण्याचा प्रयत्न) शेवटी केला आहे. प्रस्तुत पत्रकाराच्या आधी मी स्वतः सकाळमध्ये एक पत्र लिहून स्वतंत्रपणं खुलासा केला होता. आणि डॉ. मेहेंदळ्यांनी उल्लेख केलेलं पत्रही मी वाचलं होतं. पण पुन्हा त्याच विषयावर पत्र लिहिण्याचा उत्साह मला नव्हता. एक तर हा काही तितका महत्त्वाचा विषय नव्हता. आणि दुसरं म्हणजे कितीही खुलासा केला तरी, गणिताबाहेरचे लोक सांगितलेलं समजूनही न घेता, गणिताबद्दलचे आपले घट्ट पूर्वग्रह सोडण्यास तयार नसतात, असा माझा वैयक्तिक अनुभव होता. पण डॉ. मेहेंदळ्यांसारख्या पंडितांनी, तेही 'भाषा आणि जीवन'मध्ये, चुकीच्या स्पष्टीकरणाला शास्त्रशुद्धतेचं प्रशस्तिपत्र दिलं आहे त्यामुळं, त्यावर निदान 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांकरता तरी खुलासा करावा असं वाटतं. म्हणून हा लेखन प्रपंच.

हा गोंधळ होण्याचं मुख्य कारण मोजमाप दोन प्रकारचं असतं. हा मुख्य मुद्दा दुर्लक्षिला गेला आहे. एक-पूर्ण अशा स्वतंत्र, सुट्टया सुट्टया वस्तूंचं आणि दुसरं संतत मापांचं. पुस्तकांची, फळांची इत्यादी (अच्छेद्य) वस्तूंची संख्या मोजायची असेल तर १ पासून मोजणं सुरू केलं पाहिजे, हे बरोबर आहे. आणि तसंच आपण करतो. पण अंतर, वेळ यासारख्या संतत परिमाण असलेल्या मापाची 'संख्या' ठरवायची असेल तर, १ पासून आरंभ करून चालत नाही. शून्यापासूनच आरंभ केला पाहिजे. आपणा सर्वांच्या घरी मोजपट्टी असेल. तिचं निरीक्षण करावं. १ चा अंक तिच्या आरंभीच्या खुणेवर नसतो. तो पुढच्या पहिल्या मुख्य खुणेपाशी असतो. गरज नसल्यानं आरंभीच्या खुणेपाशी शून्याचा अंक लिहिलेला नसतो. अनुस्यूत असतो. पण तो नसला तरी तिथं अंक लिहायचा झाला तर शून्यच लिहायला लागेल. म्हणून, संकेतानं, तिथं तो आहे असं गृहीत धरून चालतात. त्यामुळं शून्याचं चिन्ह दाखवीत नाहीत, इतकंच. अंतर मोजणारं मीटर, किंवा विजेचं मीटर, किंवा पेट्रोल भरणारं मीटर पाहिलंत तर, ते सुरू होण्यापूर्वी सर्वत्र, शून्यच असतं.

सर्वांच्या ओळखीचं असं एक उदाहरण घेऊ. समजा आपल्याला जमिनीची मोजणी करायची आहे. पण आपल्या टेपचा पहिला फूट निकामी झाल्यामुळे काढून

टाकलेला आहे आणि त्यामुळे टेपच्या आरंभीच्या टोकाशी, स्वाभाविकत:च १ अंक आहे. आपल्याला हवा तो बिंदू तिथून १० फूट खूण असलेल्या ठिकाणी आला असेल तर ते अंतर १० फूट झालं असं आपण म्हणत नाही. तर गमावलेला पहिला १ फूट वजा करून अंतर ९ फूट झालं असंच म्हणतो. पण, याचा अर्थ एरवी, टेप चांगली असेल तर, आपण १ पासून न मोजता शून्यापासूनच मोजतो असाच होतो की नाही? याचं कारण अंतर हे संतत मोजमाप आहे. स्वतंत्र अच्छेद्य वस्तूंचं मोजमाप नव्हे.

जे अंतराचं तेच काळाचं. काळही संततच मोजमाप आहे. त्यामुळं त्याची मोजणीही शून्यापासूनच करावी लागेल. आता, एकदम सहस्रकाचा विचार करण्याऐवजी घरातलंच सोपं उदाहरण घेऊ. समजा आपल्या घरात एक बाळ जन्मलं आहे. जन्म झाल्यावर बाळाचं पहिलं वर्ष सुरू होत असलं तरी ते वर्ष अजून पूर्ण व्हायचं असतं. एक वर्ष पूर्ण झाल्यावर आपण बाळ एक वर्षाचं झालं असं म्हणतो. त्यावेळी त्यानं दुसऱ्या वर्षात केवळ पदार्पण केलेलं असतं. दुसरं वर्ष **पूर्ण केलेलं नसतं.** त्याला ९ वर्ष पूर्ण होऊन १०व्या वर्षात पदार्पण करण्याचा त्याचा वाढदिवस समारंभ करताना आपण ते १० वर्षांचं झालं असं म्हणत नाही. ९ वर्ष पूर्ण केली असं म्हणतो. म्हणजेच निराळ्या शब्दांत, त्यानं आयुष्याचं एक दशक पूर्ण केलं असं म्हणणार नाही. किंवा दुसऱ्या दशकात प्रवेश केला असंही म्हणत नाही. हा गोंधळ आपल्या समाजात शिरण्याचं मुख्य कारण, माझ्या मते, पाश्चात्यांचं अंधानुकरण. पाश्चात्य लोक वाढदिवस साजरा न करता जन्मदिवस मानतात. म्हणजे बाळ जन्मलं तो पहिला जन्मदिवस दिवस. त्यामुळं ते एक वर्षाचं होताना दुसरा जन्मदिवस असतो. पण, पाश्चात्यांचं ते सर्वच बरोबर ह्या कल्पनेतून आपणही तसंच स्वीकारीत राहिलो. इतकंच.

पण, जेव्हा कालगणनेचा आरंभ झाला असं आपण मानतो, तिथं शून्य असल्याचं मानण्यात येत असलं तरी ते वर्ष पहिलं असल्यामुळं तारीख मात्र **१.१.१. अशी लिहावी लागते. १.१.० अशी नव्हे.** हा सूक्ष्म आणि आपल्या समजुतीच्या दृष्टीनं महत्त्वाचा, फरक दुर्लक्षून चालणार नाही. पण इसवीसन नेमका केव्हा सुरू झाला? जीजसच्या जन्मापासून? पण जीजसचा जन्म नेमका केव्हा झाला याविषयी काहीही प्रमाण मिळत नाही. हेरॉड द ग्रेटच्या काळात (इसपू ४ ते १च्या दरम्यान) केव्हा तरी झाला असावा.

आपण जे कॅलेंडर आज वापरतो, त्याला ग्रेगरी म्हणतात. शिवाय पूर्वी

वर्षारंभसुद्धा २५ मार्चला होत असे. (भाषा आणि जीवन, वर्ष २० अंक१, पृ.४९ वरील माझा लेख पहावा.) त्यातही, प्रत्येक शतकवर्षसुद्धा (४०० नं भाग जात नसला तरीही) लीपवर्ष असल्याचं धरून चालल्यामुळं ११ दिवसांनी तारीख मागं पडून दोष निर्माण झाला होता. तो दूर करून ११ दिवसांची उडी मारून आणि १ जानेवारीला वर्षारंभ करायचं ठरवून पोप ग्रेगरीनं काही सुधारणा अंमलात आणल्या. हे सांगण्याचं कारण, इसवीसनाच्या आरंभाबद्दल मूळातच खूपच गोंधळ आहे. त्याबद्दल कोणीच काही नेमकं सांगू शकत नाही. त्यात ग्रेगरीनं केलेल्या ह्या बदलामुळं आणखी भर पडली आहे. पण आपल्या समजुतीकरता आपण जेव्हा केव्हा इसवीसन सुरू झाला असेल. तेच **पहिलं वर्ष** आहे असं समजू. मग, वर म्हटल्याप्रमाणं, आरंभीची १.१.१ तारीख होती असं मानावं लागेल. ती तारीख १.१.० अशी असणार नाही. मग १ वर्षानं १.१.२ अशी तारीख येईल. असं करता करता १० वर्षांनी १.१.११ अशी तारीख येईल. १०० वर्षांनी १.१.१०१ आणि २००० वर्षांनी १.१.२००१ तारीख येईल. १.१.२००० नव्हे. म्हणजेच, १.१.२००० रोजी २००० वर्ष पूर्ण होत नाहीत. १९९९ वर्षच पूर्ण होतात. हा खुलासा पुरे ना?

ह्या विषयावर एक तपशीलवार लेख मी 'विज्ञानयुग' नावाच्या मासिकात (मे १९९६, पृ. ३६) लिहिला होता. ज्यांना अधिक जिज्ञासा असेल त्यांनी अवश्य पहावा.

ओघानं आलं म्हणून आणखी एक मुद्दा. एकविसाव्या शतकात किंवा तिसऱ्या सहस्रकात प्रवेश असं म्हटल्याशिवाय, आपल्या बोलण्याला वजन येणार नाही, ह्या कल्पनेतून जो तो असले निरर्थक शब्दप्रयोग करीत असतो. आणि अजूनही असा खुळेपणा चालूच आहे, असं आढळतं. शिवाय, काळ काही असा एका सहस्रकातून उडी मारून एकदम पुढच्या सहस्रकात जात नसतो. तो संतत असतो. कालगणनेचा आरंभ कृत्रिम आहे. त्यातच इसवी सनाच्या आरंभाबाबत जो काही घोळ आहे, तो आपण पाहिलाच. तेव्हा असले निरर्थक शब्दप्रयोग वापरून आपण काय साधतो, कुणास ठाऊक?

आणि जग काय २००० वर्षांपूर्वीच सुरू झालं का? त्याआधी संपूर्ण अंधार होता का? भारतीय संस्कृती तर तत्पूर्वी हजारो वर्ष अस्तित्वात होतीच ना? परकीय लेखकाचं एक प्रमाण देतो. गिनेज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डसची २०००सालची आवृत्ती मी पाहिली. सर्वात जुनी संस्कृती भारतीय असल्याचा उल्लेख तिच्यात

वाचायला मिळाला आणि भारतीय कालगणनेप्रमाणं तीन वर्षांपूर्वीच आपण ५१ शतकं पार करून ५२व्या शतकात प्रवेश केला आहे, ते वेगळंच. त्यामुळं निदान आपल्याला असा नाचरेपणा करायचं काहीच कारण नाही.

**तीन** – श्री. मोहनी यांच्या सूचनेवर भाष्य करताना, शब्दांच्या दूरान्वयामुळं कसा अडथळा निर्माण होतो, हे सांगण्याकरता डॉ. मेहेंदळ्यांनी मोहनीचंच एक वाक्य दिलं आहे. (पृ. ३७ शेवटचा परि.) आणि संदर्भ ८ मध्ये आपल्या हातूनही अशा चुका होत असल्याचं प्रांजलपणं मान्यही केलं आहे. अशा प्रकारची किती तरी उदाहरणं 'तीन पायाची बाई' ह्या लेखात मी दिली आहेत. (वर्ष १५, अंक ३, पृ.५८)

■

**'मृण्मयी', ५६ जेधेनगर, पुणे - ४११ ०३७.**

**कानी पडलेला संवाद**

## आहे उत्तर ... ?

पुण्याच्या मराठी कुटुंबातला चार वर्षांचा एक मुलगा. इंग्रजी माध्यमाच्या शाळेत नुकताच जायला लागलेला. एका रविवारी त्याला पोलिओचा रोगप्रतिबंधक डोस देण्यात आला. त्याच्या आईवडिलांनी त्याला आरोग्य केंद्रावर नेऊन हे काम पार पाडलं.

दुसऱ्या दिवशी सोमवारी तो शाळेतून आला तेव्हा त्यानं आपल्या बाबांना सांगितलं, आज ना आम्हांला परत पोलिओचं औषध दिलं शाळेत.

बाबा म्हणाले, "अरे मग सांगायचं नाहीस का, मी कालच घेतलंय म्हणून?"

मुलगा : एवढं कुठे मला इंग्रजीत बोलता येतंय अजून?

बाबा : अरे, मग बाईंना मराठीत सांगायचंस ना!

मुलगा : अहो, आमची इंग्लिश मिडियम शाळा आहे ना? टीचरना कसं येत असेल मराठी?

■

**विजया देव**

# अध्यात्माची विशेष परिभाषा व व्यवहार - काही निरीक्षणे

यशवंत गणेश जोशी

कायद्याची भाषा गूढ असते. कायद्याप्रमाणे अध्यात्माची परिभाषाही गूढच असते. त्यामुळे ती परिभाषा समजण्याचे दृष्टीने काही नमुने सादर करत आहे.

अ) व्यावहारिक भाषेत दृष्टी नसलेल्या माणसास अंध, अंधळा असे संबोधिले जाते पण अध्यात्मिक भाषेत चर्मचक्षुविहीन - 'आत्मचक्षु' असे संबोधितात. उदाहरणार्थ आत्मचक्षु गुलाबराव महाराज. ते जन्मतः दृष्टीहीन अंध होते. परंतु त्यांना अनेक आध्यात्मिक ग्रंथ तोंडपाठ होते व त्यावर ते मार्मिक भाष्य, निरुपणे, प्रवचनेही करीत असत.

आ) व्यावहारिक भाषेत एखाद्या माणसाचे निधन होते पण आध्यात्मिक भाषेत त्या माणसाने देहत्याग केला अगर तो पंचत्वांत विलीन झाला असे म्हणतात. अधिक काव्यात्मक, रूपकात्मक भाषेत - 'प्राणपखेरु उड गये' असे भजन - कवन तयार होते.

इ) १) व्यवहारांत एखाद्या इसमास पुरेसं अन्न न मिळाल्याने त्याचे निधन झाल्याने - तो कुपोषणामुळे - मृत्यू - भूकबळी होतो. पण जाणीवपूर्वक अन्नाचा त्याग केल्याने निधन झाल्यास त्यास प्रायोपवेशन म्हणतात. ती आत्महत्या होत नाही. जैन अध्यात्म शास्त्राप्रमाणे त्यास 'संथारा' व्रत म्हणतात. २) एखादा मोठा कार्यक्रम उदा. अधिवेशन, संमेलन संपन्न म्हणजे त्या निमित्ताने कष्टकरी आदी लोकांसाठी जेवण (कटाव जेवण - हा खास शब्द) आयोजित केले जाते. आध्यात्मिक भाषेत अशा कार्यक्रमास वेगवेगळ्या संदर्भात काबा, प्रसाद, महाप्रसाद, भंडारा असे संबोधिले जाते. कष्टकरी लोक हे 'कारसेवक' बनतात. दर्शनार्थी पाहुण्याचे जेवणाने स्वागत करण्याचा 'लंगर' हा खास धार्मिक व्यवहार आहे. ३) एखाद्या कार्यक्रमास उपस्थित राहण्याचे निमंत्रण असल्यास तशी त्या निमंत्रणकर्त्याची इच्छा आहे हे उघडच आहे. पण श्राद्धासाठी (मृत व्यक्ती निधन

झाल्याचे १०वे दिवशी) प्रसादास म्हणजे जेवणासाठी येण्याची सर्वांना निमंत्रणे दिली जातात. पण जवळच्या नातेवाईकांव्यतिरिक्त इतर कोणीही जेवावयास जावयाचे नाही असा अलिखित (व्यवहार) नियम आहे. ४) देवपूजेसाठी आंघोळ न करता (पारोशाने - विशिष्ट शब्द) दिलेले पाणी चालत नाही. तसेच आंघोळ करूनही व धूत (धुतलेले कपडे) घालूनही आदल्या दिवशी भरलेले साठवणीचे पाणी चालत नाही, कारण ते 'ताजे' असत नाही. शिळे झालेले असते. आधुनिक भाषेत टीकाकार यासच 'कर्मकांड' असे म्हणतात. ५) गुढी (चैत्र पाडव्याच्या दिवशी नववर्षाच्या स्वागतासाठी उभारावयाचा ध्वज) उभारतेवेळी काठीस बांधण्यासाठी सुतळी वापरलेली चालत नाही कारण सर्वसाधारणपणे तिरडी (कलेवर वाहून नेण्यासाठी तयार केलेली बांबूची शय्या) बांधण्यासाठी सुतळीचा वापर होतो. म्हणून ती शुभ कार्यास निषिद्ध! तूर्तास अध्यात्म पुराणातील एवढी वांगी पुरे. (पाहा : 'भाषा आणि जीवन' दिवाळी २००१ अंकामधील सुप्रिया सहस्रबुद्धे यांची पान ८ वरील चौकट.)

इति अवम् विस्तरेण - लेखन सीमा

■

१८५२/१ धोंगडे गल्ली, पंढरपूर ४१३ ३०४

---

## आर्थिक दारिद्र्य पण भाषिक समृद्धी.

आपली भरभराट व्हावी या इच्छेने कर्माची कास धरायला स्वतःलाच सांगताना ही व्यक्ती दैन्याला भाषेचा साज कसा चढवते पाहा. समासांच्या नावांच्या अर्थपूर्ण योजनेतून साधलेला विनोद.

"द्वन्द्वौ द्विगुः अपि च अहं मद्गेहे वर्तते अव्ययीभावः ।
तत्पुरुष कर्मधारय येन अहं स्यां बहुव्रीहिः"

**अर्थ :** मी सपत्निक आहे. (द्वंद्व) माझ्याकडे दोन गायी आहेत त्यांना मला पोसावं लागतं, (द्विगु :) खर्चाचा माझ्याकडे अभाव आहे (अव्ययीभाव) तरी हे पुरुषा, असे कर्म आचर (तत्पुरुष, कर्मधारय) की ज्याजोगे मी पुष्कळ तांदुळवाला (बहुव्रीही) होईन.

■

प्रेषक - विजया देव







## पुस्तक परीक्षण

# विद्यापीठ प्रशासनाच्या मराठीकरणास साह्यभूत होणारे पुस्तक

**विद्यागौरी टिळक**

*('विद्यापीठ प्रशासनाचे मराठीकरण' - डॉ. गीता भागवत, शिवप्रताप प्रकाशन, पुणे, ऑगस्ट २०००, पृ. १२, + १२०, मूल्य रु. २५०/-)*

डॉ. गीता भागवत यांचा परिचय मराठी भाषेच्या अभ्यासकांना त्यांच्या 'प्रशासनिक मराठी भाषेचा विकास' या ग्रंथाद्वारे यापूर्वी झालेला आहे. हिंदी, मराठी भाषा व भाषाविज्ञान यांचा त्यांनी विशेष स्तरावर अभ्यास केलेला आहे. तसेच महाराष्ट्र राज्य शासनाच्या भाषा संचालनालयातील सहायक भाषा संचालक या पदापर्यंतचा विविध स्तरांवरील कामाचा अनुभव त्यांच्या गाठीशी आहे. या अनुभवाद्वारे त्यांनी प्रशासनिक क्षेत्रातील मराठीसंबंधी केलेले लेखन विद्वन्मान्य ठरले आहे.

प्रशासनिक क्षेत्रापेक्षा 'विद्यापीठ प्रकाशन' या उपक्षेत्रातील भाषा व्यवहार काही बाबतींत वेगळा असतो. हे ध्यानात घेऊन त्यातील मराठी भाषाव्यवहार वाढावा, अधिकाधिक निर्दोष व्हावा, प्रशासनाची कार्यक्षमता त्यामुळे वाढावी या हेतूने डॉ. भागवत यांनी आता 'विद्यापीठ प्रशासनाचे मराठीकरण' हे पुस्तक तयार केले आहे.

या पुस्तकाची एकंदर सात प्रकरणांमध्ये विभागणी केली आहे व त्यांना चार परिशिष्टांची जोड दिलेली आहे. पहिली तीन प्रकरणे विद्यापीठीय क्षेत्रातील प्रशासन व भाषव्यवहार यांची चर्चा करणारी आहेत, तर पुढील चार प्रकरणांमध्ये एकंदरीत प्रशासनिक भाषेसंबंधीची कोणती तत्त्वे या विशिष्ट उपक्षेत्राच्या संदर्भात प्रस्तुत आहेत हे लक्षात घेऊन त्या अनुषंगाने विवेचन केलेले आहे. निवडक उपयुक्त शब्दांची सूची, उपयुक्त संदर्भग्रंथ व स्वाध्यायासाठी लेखन प्रकारांचे प्रचलित नमुने अशी या पुस्तकाची आखणी आहे.

सुरवातीच्या प्रकरणात 'विद्यापीठाच्या कामकाजात मराठी का हवी?' याबद्दलची चर्चा आहे. कार्यक्षमतेत सुधारणा, सर्वसामान्य जनतेशी संपर्क वाढणे,





अनुक्रमणिका

मराठीचा अभिमान राखणे या उद्दिष्टांशी तत्त्वतः सहमत असूनही प्रत्यक्ष व्यवहारात त्यासाठी आवश्यक त्या प्रमाणात मराठीचा वापर होत नाही, या वस्तुस्थितीकडे डॉ. भागवत यांनी लक्ष वेधले आहे. ही वस्तुस्थिती कुणालाही मान्य होण्याजोगी आहे. मात्र इतर कारणांसोबत त्या 'विद्यापीठांचे आपली स्वायत्तता, शासनापेक्षा अलगता जोपासण्याचे धोरण' असे जे कारण सूचित करतात, त्यात मात्र तथ्य वाटत नाही. सर्व नियम, पूर्वसंदर्भ इंग्रजीत उपलब्ध असल्याने त्याबाबतीत कर्मचाऱ्यांना इंग्रजी भाषेसंदर्भात जाणवणारे सरावलेपण, दीडशे वर्षांची इंग्रजांची मानसिक गुलामगिरी ही त्यांनीच नोंदवलेली इतर कारणे अधिक वस्तुस्थिती निदर्शक आहेत. या प्रकरणात विद्यापीठाच्या प्रशासनाच्या नेमक्या कार्यक्षेत्राची जी चर्चा आहे, ती उद्‌बोधक आहे. 'एज्युकेशन ॲडमिनिस्ट्रेशन' या शाखेत वस्तुतः 'शिक्षणदान' हे कार्य अभिप्रेत असते, त्यामुळे त्यातील माध्यम हा स्वतंत्र विषय ठरतो. माध्यम कोणतेही असले, तरी 'ऑफिस ॲडनिमिस्ट्रेशन'ची - 'कार्यालयीन प्रशासना'ची भाषा मुख्यत्वे मराठीच असली पाहिजे, असे त्या नोंदवतात. ही त्यांची भूमिका स्वागतार्हच आहे.

'प्रशासनिक भाषा' या उपक्षेत्रातील भाषिक व्यवहाराच्या गरजा त्यांनी स्पष्ट केल्या आहेत. त्याचप्रमाणे साहित्यिक भाषा, स्थानिक पोटभाषा, अनौपचारिक शैलीचा वापर या गोष्टी का टाळल्या पाहिजेत याचे विवेचन करताना प्रशासनिक भाषेत नेमकेपणा व सुबोधपणा या अंगांना कसे महत्त्व येते हे चांगल्या प्रकारे सांगितले आहे. या वेगळ्या भाषिक वापराचा मुद्दाम अभ्यास का करावा लागतो, याबद्दलच्या आधीच्या प्रकरणातील विवेचनाशी संगती राखून ही चर्चा आलेली आहे. त्यामुळे विद्यापीठीय प्रशासनाचे महत्त्व लक्षात येते.

विद्यापीठाचा कार्यालयीन व्यवहार समजण्यासाठी विद्यापीठांच्या कामकाजातील लेखन प्रकारांची सोदाहरण चर्चा केली आहे. कृषिविद्यापीठांसह सर्व विद्यापीठांच्या प्रशासनिक यंत्रणांची थोडक्यात ओळख करून घेऊन विविध स्तरांवर कोणत्या स्वरूपाचे लेखन आवश्यक असते, हे डॉ. भागवत यांनी सांगितले आहे. शासकीय कामकाजातील प्रचलित लेखनपद्धती व प्रकारांचाही संदर्भ काही ठिकाणी त्या देतात आणि विद्यापीठीय स्तरावर बदल कुठे व कसे आवश्यक आहेत, हे दाखवून देतात. विद्यापीठांमध्ये Ordinance व Order दोन्हींसाठी 'आदेश' हा एकच पर्याय आहे. सरकारी क्षेत्रात 'अध्यादेश' व 'आदेश' असा जो भेद केला जातो, तो तसाच येथेही करणे गरजेचे व सोयीचेही आहे, असे त्या

म्हणतात. विद्यापीठाने काढलेला तो 'कुल अध्यादेश' अशी संज्ञा येथे त्यांनी सुचवलेली आहे. याच पद्धतीने 'कुल निर्णय', 'कुल विभाग' अशाही संज्ञा आल्या आहेत. विद्यापीठीय स्तरावरील बाबींच्या स्पष्ट निर्देशासंबंधीची या तऱ्हेची तरतूद अमलात आली तर ती सोयीचीच ठरेल.

विद्यापीठ स्तरावरील कागदपत्रांचे स्थायी, निमस्थायी व प्रासंगिक असे वर्गीकरण करून प्रासंगिक स्वरूपाचे कामकाज मुळातच जास्तीत जास्त प्रमाणात मराठीत सुरू होण्याची गरज प्रतिपादन केलेली आहे. त्यामधील सामान्य पत्रे, परिपत्रके, विद्यापीठ अधिसूचना, टिप्पण्या, प्रमाणपत्रे, सूचना इत्यादी बारा प्रकारांची चर्चा आलेली आहे. प्रत्येक प्रकारचे प्रयोजन, आवश्यक गोष्टी, भाषिक दृष्ट्या त्या प्रकारच्या लेखनात पाळायची पथ्ये याबद्दलच्या चर्चेमुळे व सोदाहरण स्पष्टीकरणामुळे विद्यापीठ क्षेत्रातील कामकाजाशी संबंधित असणाऱ्यांना हे पुस्तक निश्चितच उपयुक्त वाटेल.

या ग्रंथातील चौथ्या प्रकरणापासून पुढील तीन प्रकरणांमध्ये शब्दस्तरावरील निवड, वाक्यरचना, सुयोग्य मांडणी व शैलीदार लेखन यांसंबंधीची चर्चा आलेली आहे. भाषेच्या या विविध स्तरांवर प्रशासनिक भाषा कशी असावी, याचे सविस्तर विवेचन यात आहे. शब्दांच्या निवडीबाबतचे क्षेत्रविशिष्टता, समर्पकता, सोपेपणा इ. निकष सांगून विविध शब्दांच्या योग्यायोग्यतेबाबत केलेली चर्चा उद्‌बोधक वाटते. उदा. 'प्र. कुलगुरू' या संज्ञेतील चूक त्यांनी पटवून दिली आहे. मात्र 'विभाग' या अर्थी वा 'प्राध्यापक' या अर्थी 'अध्यासन' या शब्दाचा प्रयोग झाला व तो रुळला नाही असे त्या म्हणतात ते बरोबर नाही. मुळातच 'अध्यासन'मध्ये एक विशिष्ट अर्थ अभिप्रेत होता व त्या अर्थाने तो शब्द रुळतो आहे, किंबहुना रुळलेला आहे. त्यांनी केलेली वाक्यरचनेचीही चर्चा उपयुक्त ठरलेलशी आहे. लेखन शैलीमध्ये मांडणी व व्याकरणशुद्धतेचाही विचार केलेला आहे. या संदर्भात काटेकोरपणाची चर्चा करताना कायदा क्षेत्राशी तुलना करून, तेथे अर्थाविषयी वारंवार चालणारी 'चिकित्सा' त्या चिकित्सेसाठीच असणाऱ्या स्वतंत्र संस्था व प्रशासनक्षेत्रात त्यांच्या अभावामुळे निर्माण होणारी सुबोधतेची गरज, याकडे लक्ष वेधले आहे.

प्रशासनाचा कारभार मराठीत व्हावा, हे आपलं उद्दिष्ट असले तरी काही स्तरांवर अनुवादाची गरज भासणारच, हे लक्षात घेऊन अनुवाद कार्याच्या तंत्राचीही चर्चा गीता भागवतांनी केली आहे. वैचारिक लेखनाचा अनुवादात मूळ

मजकुरातील अर्थ, विचार संकल्पना या मूळाबरहुकूम असाव्यात अशी अपेक्षा असते त्याचबरोबर मूळ भाषा ज्यांना समजत नाही किंवा पुरेशी अवगत नाही त्यांना तो अनुवाद सहज आकलन व्हावा अशीही अपेक्षा असते मात्र ज्यांना मूळ भाषादेखील येत असते, त्यांना अनुवाद नीट न समजल्याने मूळ मसुदा पाहण्याची इच्छा होता कामा नये. हे यशस्वी अनुवादाचे त्यांनी सांगितलेले गमक प्रशासनिक क्षेत्रातील अनुवादकर्त्यांनी अवश्य लक्षात ठेवण्याजोगे आहे. या ग्रंथाचे उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याला जोडलेली परिशिष्टे. या परिशिष्टांमध्ये दैनंदिन कामकाजातील निवडक इंग्रजी संज्ञांचे शासकीय अनुवादातील मराठी प्रतिशब्द; परिभाषा कोश, व्याकरण लेखनविषयक ग्रंथ इ.ची सूची दिली आहे. शिवाय अखेरीस स्वाध्यायासाठी जे विविध लेखन नमुने दिले आहेत, ते विशेष उपयोगी पडण्याजोगे आहेत.

एकूणात, डॉ. गीता भागवत यांचे 'विद्यापीठ प्रशासनाचे मराठीकरण' हे पुस्तक त्या दिशेने प्रयत्न करू पाहणाऱ्यांना प्रत्यक्ष कार्यवाहीसाठी साह्यभूत होईलसे आहे. त्यासाठी कारभाराच्या पारंपरिक इंग्रजी चाकोरीतून बाहेर पडण्याची इच्छा मात्र अत्यावश्यक आहे.

■

**७/३०, 'गौरीनंदन', महेश सोसायटी, विववेवाडी, पुणे - ४११०३७.**

**कानी पडलेला संवाद**

## किती हा दुराग्रह!

दोन अमेरिकन एका बसस्टॉपवर उभे असतात. तिकडून एक स्वीडिश माणूस येतो. त्याला कुठलातरी पत्ता विचारायचा असतो. तो आधी जर्मन भाषेत विचारतो. दोघा अमेरिकनांना काहीच कळत नाही. मग तो फ्रेंच भाषेत विचारतो. तरीपण हे दोघं ढिम्मच. नंतर तो इटालियन, स्पॅनिश भाषेत चौकशी करतो. तरी त्या दोघांना काही कळत नाही. शेवटी तो वैतागून निघून जातो. तो गेल्यावर पहिला अमेरिकन दुसऱ्याला म्हणतो, 'एखादी परकीय भाषा आपण शिकायला हवी नाही?' त्यावर दुसरा म्हणतो, "काय जरूर आहे, त्याला चार भाषा येत होत्या. पण काही उपयोग झाला का?"

■

# भाषाविषयक लेखनाची सूची : इ. स. २००१

राजशेखर शिंदे

**दैनिकातील लेख :**

१) कुलकर्णी पी. डी., 'मायमराठीची उपेक्षा थांबवा' (दीर्घ पत्र - सदर, वाचकांचा पत्रव्यवहार) सकाळ ११ डिसेंबर, २००१ पृ. ४.

२) कुलकर्णी माधवी, 'मराठी भाषा आणि बालकांवर अन्याय' महाराष्ट्र टाइम्स, ३१ जुलै, २००१, पृ. ८.

३) कुलकर्णी वि. गो., 'मराठीचे कुंकू शासनाधीन आहे?' लोकसत्ता, ६ सप्टेंबर, २००१, पृ. ४.

४) कुलकर्णी शिरीन, 'मऱ्हाटी संस्कृतीच्या ऱ्हासाचे पहिले पाऊल', महाराष्ट्र टाइम्स, ९ ऑगस्ट, २००१, पृ. ८.

५) गुंडी नीलिमा, 'कनिष्ठ महाविद्यालयीन स्तरावरील मराठी', महाराष्ट्र टाइम्स, १९ ऑगस्ट, २००१, पृ. ६.

६) गुंडी नीलिमा, 'नादाचे रूपडे', लोकसत्ता, चतुरंग पुरवणी, २० ऑ. २००१, पृ. ४.

७) जावडेकर प्रकाश, 'मराठीला अजूनतरी पर्याय नाहीच' लोकसत्ता, ३१ ऑगस्ट, २००१, पृ. ६.

८) जोगळेकर गं. ना., 'भाषेला भाषा हाच पर्याय असू शकतो,' लोकसत्ता, ४ सप्टेंबर, २००१, पृ. ४.

९) जोगळेकर गं. ना., वस्तुस्थिती दडवण्याची शिक्षणमंत्र्यांची धडपड', लोकसत्ता, २३ ऑक्टो. २००१, पृ. ६.

१०) टिकेकर अरूण, 'सामाजिक न्याय की मराठी, हाच कळीचा मुद्दा', लोकसत्ता, (संपादकीय - अग्रलेख), ३० ऑक्टो. २००१, पृ. ६.

११) तापस विजय, 'मायबोली मराठीला सरणावर चढविण्याचा पराक्रम', महाराष्ट्र टाइम्स, ३१ जुलै २००१, पृ. ८.

११.१) नागपूरकर सुनीता, "पाठ्यपुस्तकाशिवाय मातृभाषा शिकविता येते" लोकमत, ४ नोव्हें., पृ. २.

१२) नातू हरी, 'ग्रामीण विद्यार्थ्यांना इंग्रजी यावे, यासाठी प्रयत्न', सकाळ, ३०

ऑक्टो. २००१, पृ. ४.
१३) परब प्रकाश, 'मराठी भाषेवर सरकारी दरोडा,' महाराष्ट्र टाइम्स, २७ जुलै २००१, पृ. ८.
१४) परब प्रकाश, 'मराठीसाठी आंदोलन : समज आणि गैरसमज', महाराष्ट्र टाइम्स, २० सप्टें. २००१, पृ. ८.
१५) प्रभू परेश, 'मराठीला राजभाषेचा दर्जा देण्याची जोरदार मागणी', सकाळ, प्रतिभा पुरवणी, १८ नोव्हेंबर २००१, पृ. १४.
१६) पंडित अनुपमा, 'विद्यार्थ्यांना लेखनसराव हवाच' (दीर्घ पत्र) सकाळ, सदर-वाचकांचा पत्रव्यवहार, ११ नोव्हेंबर २००१, पृ. ४.
१७) पाटणकर वसंत - 'माहिती तंत्रज्ञान आणि स्वभाषेचा बळी', महाराष्ट्र टाइम्स, २० सप्टेंबर २००१, पृ. ८.
१८) पाटील कपिल, 'मराठीचे मारेकरी कोण?', महाराष्ट्र टाइम्स, २ डिसेंबर, पृ. ११.
१९) पाठक सु.सुं. 'भाषा आणि जीवन' सकाळ, प्रगती पुरवणी, २४ ऑक्टोबर, २००१, पृ. ३.
२०) माजगावकर दिलीप, दिब्रोटो फ्रान्सिस, 'भाषा सक्तीने नव्हे, भक्तीने शिकायची असते!', सकाळ, प्रतिमा पुरवणी, ३० डिसें. २००१, पृ. ९ व १०.
२१) मुणगेकर भालचंद्र, 'भाषाविकासाचे धोरण व्यवहार्य हवे', महाराष्ट्र टाइम्स, १६ डिसें. २००१, पृ. ५.
२२) मोरे रामकृष्ण, 'मराठीचा बागुलबुवा दाखवून भेडसावू नका', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, २६ ऑगस्ट २००१, पृ. १.
२३) मोरे रामकृष्ण, 'मराठी हा पर्याय, पण एकमेव पर्याय नाही', लोकसत्ता, १८ सप्टेंबर २००१, पृ. ४.
२४) मोरे रामकृष्ण, 'जोगळेकरांची भूमिका खाष्ट सासूची', लोकसत्ता, ३० ऑक्टोबर २००१, पृ. ४.
२५) वाळिंबे प्रवीण, 'मराठीची ही अवहेलना थांबवायला हवी', सकाळ, २५ जुलै २००१, पृ. ४.
२६) शास्त्री जी. पी. 'व्याकरणाकडे पाठ कराल, तर मराठी कशी कळेल?' सकाळ, नोकरीविषयक पुरवणी, २१ डिसें. २००१, पृ. २.

२७) साधू अरूण, 'फक्त एकच फतवा काढा ... मराठीत बोला', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, १९ ऑगस्ट, २००१, पृ. १.

**नियतकालिकातील लेख :**

१) अकलूजकर विद्युल्लेखा, 'एकवचन बहुवचन' (सदर 'भाषावेध'), साप्ताहिक सकाळ, १७ फेब्रुवारी, २००१ पृ. २६-२७.

२) अकलूजकर विद्युल्लेखा, 'मराठीतील पडझड' (सदर 'भाषावेध'), साप्ताहिक सकाळ, २४ मार्च, २००१, पृ. २०-२१.

३) अकलूजकर विद्युल्लेखा, 'आडनावात दडलेले खाद्यजीवन' (सदर 'भाषावेध') साप्ताहिक सकाळ, १९ मे, २००१, पृ. ५१-५२.

४) अकलूजकर विद्युल्लेखा, 'न तथा बाधते शीतम्', साप्ताहिक सकाळ, २९ सप्टेंबर, २००१, पृ. २४-२५.

५) कुलकर्णी धनंजय, 'भाषा शिक्षणाची वेगळी वाट' (सदर 'भाषावेध') सा. सकाळ, २४ एप्रिल, २००१, पृ. २३-२४ व ५७.

६) टाकसाळे संध्या, 'इंग्रजी संवादकौशल्य वाढविण्यासाठी', साप्ताहिक सकाळ, ९ जून, पृ. २७-२७.

७) धोंगडे दिलीप, 'तुकारामांच्या अभंगवाणीची अवतरणक्षमता', नवभारत, ऑक्टोबर २००१, पृ. २७-४२.

८) पाटणकर रा. भा., 'मराठी व इंग्रजी वैचारिक गद्य - १७ वे व १८वे शतक, अनुष्टुभ, जुलै-ऑगस्ट, २००१, पृ. १५-२९.

९) बाळ प्रकाश, 'मराठी जगेल कशी?' साप्ताहिक सकाळ, १८ ऑगस्ट २००१, पृ. ६-७.

१०) भटकळ रामदास, 'गांधी आणि भाषा', साप्ताहिक साधना, २९ सप्टेंबर २००१, पृ. ४-१०.

११) सहस्रबुद्धे वर्षा, 'मुलांची भाषा आणि शिक्षक', लेखांक १, पालकनीती, सप्टें. २००१, पृ. १४-१५ लेखांक २, पालकनीती, डिसेंबर २००१, पृ. ४-५.

१२) साधू अरुण, 'आग्रह हवा मराठीचा', अनुभव, ऑक्टोबर २००१, पृ. ३४-३७.

१३) सारंग विलास, 'भाषा वाहते आहे', अनुष्टुभ, मे-जून, २००१, पृ. २-३.

१४) संगवई संजय, 'नवी भाषक पत्रकारिता : स्वतःची शक्ती जाणिवा', अभिव्यक्ती (त्रैमासिक), जुलै - सप्टें. २००१, पृ. २-८.

१५) हर्डीकर धनवंती, 'इंगजी शिकणं अवघड नाही', साप्ताहिक सकाळ, ९ जून २००१, पृ. २८, ३०, ३१.

**पुस्तके**

१) आचार्य माधव ना., 'मराठी व्याकरण विवेक,' स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
२) आवलगावकर अविनाश, शहा मृणालिनी (संपा.) 'मराठीचे भवितव्य?', मानसन्मान प्रकाशन, पुणे.
३) कानडे मु. श्री. नगरकर रा. शं. (संपा.), 'एकनाथी भागवत, शब्दार्थ - संदर्भ - कोश', रामकृष्ण प्रका., पुणे.
४) कुलकर्णी गो. ग., 'संस्कृत सुभाषित संग्रह,' स्नेहल प्रकाशन, पुणे.
५) गद्रे अनुराधा, 'सोपे शालेय मराठी व्याकरण' (५ ते ७वी), मनोरमा प्रकाशन, पुणे.
६) झांबरे स. ध., 'मराठी शब्दाभ्यास कोश', साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
७) झांबरे स. ध., 'मराठी म्हणी व वाक्प्रचार कोश', साकेत प्रका., औरंगाबाद.
८) धोंगडे दिलीप, 'शैली मीमांसा : सिद्धान्त आणि उपयोजन', शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर.
९) पटवर्धन अनिता, पोरे सतीश (संशोधन व संयोजन), 'मराठी-कार्यात्मक-व्याकरण' इं. १ ते ५ शिक्षक हस्तपुस्तिका, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.
१०) बेल्हेकर राजेश, 'विद्रोही सुविचार' (भांडणविषयक) उन्मेष प्रकाशन, पुणे.
११) मोकाशी मधुकर, 'मराठी भाषेची स्थिती आणि गती', साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे.
१२) राजगुरू माधव (संपा.), 'मराठी-मराठी-शब्दकोश', महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन, पुणे..
१३) लेले वामन केशव, 'वाक्यकोश', राजहंस प्रकाशन, पुणे.
१४) वेदालंकार वेदकुमार, 'संस्कृत सुभाषित-सागर', दिलीपराज प्रकाशन, पुणे.
१५) शितूत शालिनी, 'मायबोलीची आभूषणे', (म्हणी व वाक्प्रचार) उन्मेष प्रकाशन, पुणे.
१६) सहस्त्रबुद्धे प्र. ग., 'माय मराठीची हाक', प्रकाशक , रामसिंह चुनावाले, यवतमाळ, (२००१).

■

# 'विचक्षणांचे वैलक्षण्य' की दृष्टान्तातील दैवदुर्विलास!

दा. ल. अडोणी

शास्त्रीय ग्रंथात एखादा सिद्धान्त स्पष्ट करण्यासाठी अभ्यासकांना ठराविक उदाहरण दिलेले आढळते. जसे - तर्क - न्यायशास्त्रात 'अनुमान' प्रमाणासाठी 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः' हा ठराविक दृष्टान्त नेहमी देण्यात येतो. येथे व्याकरण व तर्कशास्त्र या शास्त्रांतील अशा झालेल्या दोन उदाहरणांकडे एका वेगळ्या - 'अशास्त्रीय' दृष्टीने पाहत आहे. हे केवळ 'परिहास विजल्पित' आहे. ही भूमिका आवर्जून नोंदविली पाहिजेच काय?

(१) 'घाण्याचा' बैल!

"अजुनि चालतोचि वाट, माळ हा सरेना" - रेंदाळकर
जातीने (गव - जात) बैल ढवळा, वर्णे-गुणे जो भला
स्वेच्छेने बहुतांत 'व्यक्ति' कळण्या तो 'डित्थ' नावाजला;
(घाण्याला जणु जुंपिला) चल सदा ऐशी क्रिया विश्रुत,
दावाया पदवृत्ति ही चहुविधा, ओढी पदां आ-नत

१.'शब्दानां चतुष्टयी प्रवृत्तिः - जाति शब्दाः गुण शब्दाः क्रिया शब्दाः यदृच्छा शब्दाश्च । यथा - गो शुक्लः चलो डित्थः । ('डित्थ' हे बैलोबाचे नाव) - व्याकरण महाभाष्य, 'आह्निक' २) 'गो' मुखाने पाठांतर - (अजुनि ..... माळ हा सरेना'चे - "अजुनि चालतोचि वाट, 'पाठ' हा सरेना". या चरणावरील विवृत्ति (विवरण) - अलीकडे पाठांतराची - पाठ करण्याची प्रवृत्ती उणावत आल्यामुळे 'आह्निका'चा - दिवसात पूर्ण करायचा पाठ म्हणजे अभ्यास, पूर्ण होत नाही म्हणून त्या बिचाऱ्या (घाण्याच्या) बैलाला सारखे रखडावे लागते, असा हंबारव या गोमुखातील पाठांतराने 'ध्वनित' होतो - असा भाव.

वस्तुतः सूत्रवाकारिका, त्यावर आवश्यक तेवढीच सरलार्थक 'वृत्ति', मग अर्थ अधिक स्पष्ट करणारे, ऊहापोहात्मक भाष्य, अशी 'टीकां'ची परिपाटी आहे. येथे 'गोमुखातील पाठांतरा'मुळे (अन्य पाठांमुळे) (महा) भाष्यानंतर 'विवृत्ति' असा व्युत्क्रम-उलटा प्रकार करावा लागला. या मर्यादातिक्रमाबद्दल मुनी पतंजलीला

'क्षमस्व' म्हणून प्रणतांजली वाहतो.

२. "त्रिपदा तार्किकी"

i) "मृत-मारण हे तुम्हां नव्हे युक्त" - मोरोपंत

ii) 'मरे एक त्याचा दुजा शोक नाही' - जनाचा अ शोक

आहे मानव मात्र मर्त्य म्हणुनी सॉक्रेटिसा मारणे का की मानव तो (सदा विष मृता का युक्त हो पाजणे?) तत्त्वज्ञास भल्या करून पुढती, ही तर्कयुक्ती बरी आत्मानात्मविदासतर्पण करी ही तर्कटाची परी!

इंग्रजी तर्कशास्त्राच्या (Logic) पुस्तकांत Syllogism चे हे हमखास आढळणारे पारंपरिक उदाहरण. पिढ्यान्‌पिढ्या सॉक्रेटिसाचे असे श्रद्धापूर्वक श्राद्ध, तर्कनिष्ठ तर्पण होत असते. इतकेच काय Pocket Oxford या इंग्रजी शब्दकोशातही (१९२४) नेमकी हीच नोंद उद्‌धृत केली आहे.

■

**एच१/४४४ लक्ष्मीनगर, पर्वतीलगत, महा. गृहनिर्माण परिसर, पुणे - ४११ ००९**

**सूचना फलक**

## पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

२) **प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर.

३) **मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय,
पत्ता : ३, अन्नपूर्णा १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे - ४११ ००२.

४) **मुद्रणस्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२ नवी पेठ, पुणे - ४११ ०३०.

५) **प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३ प्रमाणे

६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** मृणालिनी शहा, भारतीय,
पत्ता : १ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवणा, पुणे - ४११ ००४.

मी नीलिमा गुंडी असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**नीलिमा गुंडी**
**प्रकाशक**

# अहिराणी - मराठी कविता

सुधीर देवरे

## माले भाशा जमत नही....

तुनाबरोबर बोलाले
मी डोळास्नी भाशा वापरी पाही....
खानाखुना करी पाह्यात....
देहबोली वापरी पाही....
मन्ही बोली - अहिराणी वापरी
पाही....
पिजिन वापरी पाही....
क्रिऑल वापरी पाही....
तू तुनी 'प्रमाणभाषा' वरच आडेल
आदिम....
माले भाशा जमत नही
का तुले संवाद
माले माहीत नही!....
■

## मला भाषा जमत नाही

तुझ्याशी बोलावे म्हणून
मी डोळ्यांची भाषा वापरून पहिली...
खाणाखुणा करून पाहिल्या...
देहबोली वापरून पाहिली...
माझी बोली-अहिराणी वापरून पाहिली...
पिजिन वापरून पाहिली...
क्रिऑल वापरून पाहिली...
तरीही तू तुझ्या प्रमाण भाषेवरच ठाम
आदिम...
निदान एवढं तरी सांग,
मला भाषा जमत नाही
का तुला संवाद!
■

## मी कविताजवळ जास....

शुद्ध भाशा बोलनारा
मना मित्र येस
आणि माले
शुद्ध भाशा शिकाडानी
कोशीश करस....

तो वना का
मी त्यानासंगे शुद्ध भाशा
बोलाना प्रयत्न करस....

शुद्ध भाशानी धुंदीमा
मित्र जीतनले
सहल दूसरी जास....
तो उठी गाया का मंग मी
भाशा फेकी देस
आनि कविताजवळ जास....
■

## मी कवितेजवळ जातो

शुद्ध भाषा बोलणारा
माझा मित्र येतो
आणि मला
शुद्ध भाषा शिकवायचा
प्रयत्न करतो...
तो आला की
मी त्याच्याशी
शुद्ध भाषा बोलण्याची
कोशीश करतो...
शुद्ध भाषेच्या नशेत
मित्र जीवनाला
सहज विसरून जातो...
तो उठून गेला
की मग मी
भाषा फेकून
कवितेजवळ जातो...
■

## तव्हळ कुठे बडोदाले

लरानपननी
जगेल भाशा - अहिराणी
मी खंदी काढी खोल
तव्हळ कुठे बडोदाले
आत्तेशी वाजना ढोल!
■

## तेव्हा कुठे बडोद्याला

लहानपणी
जगलेली भाषा - अहिराणी
मी खोदून काढली खोल...
तेव्हा कुठे बडोद्याला
आत्ताशी वाजला ढोल!
■

**(सुधीर देवरे यांच्या 'आदिम तालनं संगीत' या अहिराणी कविता संग्रहातील काही कवितांचा मराठी अनुवाद.)**

## सूचना फलक

- **'भाषा आणि जीवन'** आता इंटरनेटवर उपलब्ध होत आहे. तो इंटरनेटवर वाचण्यासाठीच्या सूचना पुढीलप्रमाणे -
- **"जे जे मराठी"** या **साईटवरील 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' पहाण्यासाठी :** इंटरनेटला कनेक्ट झाल्यानंतर आपल्या कॉम्प्युटरच्या डेस्कटॉप वरील इंटरनेट एक्स्पोअररवर क्लिक करावे. पेजच्या ॲड्रेस समोर www.jjmarathi.com लिहून एंटर-की दाबावी. आता आपल्याला साईटचे होम-पेज दिसेल. येथील **'नियतकालिक विभाग'** वर क्लिक करावे.
- आता आपल्याला नियतकालिक विभागातील पहिले पान दिसेल.
  **"मराठी अभ्यास परिषद पत्रिका"** वर क्लिक केल्यावर आपण या त्रैमासिकाच्या विभागात जाता. तिथे आपणास या त्रैमासिकाविषयी माहिती मिळू शकेल. तसेच साईटवर उपलब्ध असलेल्या अंकांची नावे दिसतील. अंकाच्या नावावर क्लिक केल्यावर आपण तो अंक वाचू शकता.
  उदा. :- **भाषा आणि जीवन वर्ष २०, अंक १, हिवाळा २००२** वर क्लिक केल्यावर आपल्याला त्या विशिष्ट वेब-अंकाचे पहिले पान दिसेल.
  या पानावर उजवीकडे संस्थेचे बोधचिन्ह दिसते. तसेच आपल्याला अंकाचे मुखपृष्ठ आणि अंकासंबंधीची इतर माहिती वाचायला मिळेल. बोधचिन्हाच्या शेजारी अनुक्रमणिका असेल. स्क्रोल करून आपण ती वाचू शकता. विशिष्ट लेखावर क्लिक केल्यास सदर लेख P.D.F.form मध्ये असल्यामुळे प्रथम Adobe Acrobat open screen दिसेल व त्यानंतर आपण तो लेख वाचू शकता. या लेखांच्या फाईल्स मोठ्या असल्यामुळे त्या आपल्या कॉम्प्युटरवर डाऊन लोड होण्यास थोडा जास्त वेळ लागू शकतो.
- साईट व्यवस्थित पहाण्यासाठी खालील गोष्टींची व्यवस्था असणे आवश्यक आहे.
  Computer System : Pentium II 366 MHz
  RAM : 64 MB Minimum 128 MB Rccommended.
  Set Dispay Resolution : 800 by 600 pixels
  Acrobat Reader 3.0 or higher version should be loaded on PC
  1GB HDD space should be free to accomodate Acrobat Reader and other Temp files.
  At times you may see "cut marathi words" on screne. This can be

improved by changing the text size on browser pages. To do this, on page, click on View option; then click on Text size sub-option and click on the required size.

वरील सूचना विचारात घेऊन पुढील सुधारणा व शंकांसाठी साइटच्या 'होम पेजवरील' 'साहाय्य' ही लिंक क्लिक करा.

आपण हा अंक इंटरनेटवर वाचा आणि मित्रांना, दूरस्थांना आणि इतर इंटरनेट वाचकांनाही सांगा.

\- संपादक

## इंग्रजीच्या ओझ्यामुळे इतर जागतिक भाषांकडे दुर्लक्ष

इंग्रजी ही एक समृद्ध भाषा आहे आणि आपल्या देशात ती काहीशी रुळलेली असल्यामुळे तिच्या समृद्ध वाङ्मयाचा आणि तिच्यात जागतिक वाङ्मयाच्या होत असलेल्या अनुवादाचा उपयोग आपण करून घेतला पाहिजे, पण यासाठी सर्व समाजाच्या माथ्यावर तिचे ओझे टाकण्याचे काहीच कारण नाही. माध्यम म्हणून तर ती आमच्या विराट समाजाच्या गरजा खऱ्या अर्थाने पूर्ण करू शकणार नाही. इतःपर संस्कृतप्रमाणेच छोटा वर्ग तिचा अभ्यास करून समाजाच्या गरजा भागवील अशी व्यवस्था करणे आवश्यक आहे. राष्ट्रीयतेचा, सामाजिक जबाबदारीचा आणि जनतेच्या जवळिकीचा संस्कार क्षीण झाल्यामुळे अर्थार्जन, उपभोग हाच उद्देश शिल्लक राहतो. या सर्वांचा भाषेशी, माध्यमाच्या प्रश्नाशी, शिक्षणव्यवस्थेशी निकटचा संबंध आहे ही गोष्ट आम्ही बारकाईने विचारात घेतली पाहिजे. स्वतंत्र देशात इंग्रजी माध्यमाचा बोजा संपवला तर अन्य अनेक भाषा शिकण्याकडे ती शक्ती वळवता येईल. आपल्याला रशियन, चिनी, जपानी, फ्रेंच, जर्मन, अरबी, फारसी, स्पॅनिश या सर्व भाषा सखोलपणे अभ्यासणारे आणि दुभाष्ये म्हणून किंवा त्या त्या भाषांतील नवे ज्ञान आपल्या भाषेत त्वरित आणणारे अनुवादक म्हणून कार्य करणाऱ्यांचे मोठे गट निर्माण करावे लागतील. सध्या तरी आपण फक्त इंग्रजीवर भागवतो.

यासाठी सर्व देशातच भारतीय भाषिक अस्मितेचे चैतन्य उत्पन्न केले पाहिजे आणि यात फक्त साहित्यिकांचे कार्य महत्त्वाचे व केंद्रस्थानी न ठेवता विज्ञान, तंत्रज्ञान, समाजशास्त्र यांत कार्य करणाऱ्या विद्वानांना मानाचे स्थान देऊन सहभागी केले पाहिजे. चिन्या-जपान्यांची चिकाटी, आत्मविश्वास, स्वभाषेचे प्रेम या गोष्टी आत्मसात केल्या तर जगातील सर्व भाषांचे स्वागत करायला घराच्या खिडक्या उघड्या ठेवायला काही हरकत नाही.

■

**"निजभाषा उन्नति : स्वभाषेतच खरी प्रगती," चंद्रकांत बांदिवडेकर, ग्रंथाली ज्ञानयज्ञ, मुंबई, २०००, पृ. ४९-५०**

# अमेरिका व महाराष्ट्र यातील 'मराठी विद्यापीठाचा सेतू'

जागतिकीकरणाच्या झंझावाताने मुंबईसह उभ्या महाराष्ट्रातील मराठी मन मातृभाषेच्या भविष्यातील अस्तित्वाबद्दल शंकाकुल झालेले असतानाच सातासमुद्रापलीकडच्या अमेरिकेतही आपली मराठी पाळेमुळे टिकवून ठेवण्याची धडपड सुरू झाली आहे. केवळ मराठी भाषाच नव्हे, तर त्यासह मराठी संस्कृती, परंपरा आणि इतिहास रक्षणाच्या जबाबदारीचा हा प्रश्न असल्याने अमेरिका आणि महाराष्ट्र यात 'मराठी विद्यापीठ' या एका आगळ्या संकल्पनेचा सेतू इंटरनेटसारख्या प्रगत तंत्रज्ञानाने बांधला आणि सांधला जावा म्हणून प्रभाकर देवधर यांनी (इलेक्ट्रॉनिक क्षेत्रातील तज्ज्ञ) पुढाकार घेतला आहे.

व्यावसायिक स्पर्धा आणि व्यवहारातील उपयुक्तता या आघाडीवर मराठी भाषेचा आम्हांला उपयोग काय, असा सवाल महाराष्ट्रातील तरुण पिढीच्या ओठांवर आहे. अमेरिकेतील या मराठी कुटुंबांची मुले पहिली आठ ते नऊ वर्षे घरात मराठमोळ्या वातावरणात वाढतात. मग मात्र त्यांच्यावरील मराठी संस्कारांचा पगडा शालेय आणि महाविद्यालयीन वातावरणात विरळ होत जातो. अमेरिकन सुबत्तेबरोबर खोलवर कुठेतरी या अस्वस्थतेचा डंख दूरदेशीच्या मराठी मनाला टोचत राहतो. 'मराठी' माझ्या पुढील पिढीतही संक्रमित व्हायला हवी असे मानणाऱ्या अमेरिकन मराठीजनांनी तेथील बृहन्महाराष्ट्र महामंडळाच्या माध्यमातून मराठी विद्यापीठाची संकल्पना पुढे आणण्यास देवधर तसेच अन्य मराठी समविचारी विचारवंतांना भाग पाडले आहे. अमेरिकेत विद्यार्थ्यांनी अन्य कुठल्या भाषांची व तंत्रविषयाची पदवी व पदविका मिळवलेली असल्यास त्यांना विशेष प्राधान्य गुण (क्रेडिट पॉईंटस) दिले जातात. त्यामुळे संकल्पित मराठी विद्यापीठाच्या माध्यमातून त्यांना मराठी भाषेची पदवी वा पदविका मिळाल्यास आणि या दूरशिक्षणाची सोय इंटरनेटच्या माध्यमातून झाल्यास व्यावहारिक गरजेच्या पूर्ततेसह त्यातील मराठीपणाचा ठसाही पक्का होईल, या शक्यतेवर आता विचारमंथन सुरू झाले आहे. माजी पंतप्रधान राजीव गांधी यांचे इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातील सल्लागार आणि सुहृद तसेच सध्या मराठी विज्ञान परिषदेचे अध्यक्ष असलेले प्रभाकर देवधर,

ग्रंथालीचे दिनकर गांगल, अनुभवी सनदी अधिकारी शरद काळे, मराठीचा वसा घेतलेले डॉ. सुरेश नाडकर्णी, जेष्ठ पत्रकार राधाकृष्ण नार्वेकर, ज्येष्ठ साहित्यिक मधु मंगेश कर्णिक आदि प्रयत्नशील आहेत. मराठी विद्यापीठ या नावीन्यपूर्ण संकल्पनेच्या माध्यमातून अनेक उद्दिष्टये साध्य करता येतील. मराठीचे आंदोलन, शिक्षण आणि संस्कृती संवर्धन या त्रिवेणीचा योगही त्यामुळे जुळेल. मराठीच्या बेदखलीची उदाहरणे मराठी माणसाला चिंताग्रस्त करीत असतानाच मराठी विद्यापीठाची संकल्पना एका नव्या आशेचा किरण बनून पुढे आली आहे. त्यामुळे अमेरिका आणि महाराष्ट्रातील उद्याची तरुण पिढी यांच्यात सुसंवादही साधेल.

■

**(मेहता मराठी ग्रंथजगत मार्च २००२, पृ. ५-६)**

## विश्वग्रंथजत्रा

राजधानीच्या प्रगती मैदानावर भरवण्यात आलेली १५वी विश्व पुस्तक यात्रा (वर्ल्ड बुक फेअर) - ग्रंथयात्रा २८ जानेवारी ते ४ फेब्रुवारीपर्यंत भरली होती.

विश्व पुस्तक मेळ्याचे संयोजक नेहमीप्रमाणे नॅशनल बुक ट्रस्टने केले. यंदा 'शब्दांचे जागतिकीकरण' असे शीर्षक या ग्रंथयात्रेला देण्यात आले होते. ट्रस्टचे अध्यक्ष सीताकांत महापात्र म्हणाले, सृजनात्मक विविधतेच्या अनुवादाला ट्रस्टने सर्वाधिक महत्त्व दिले आहे, जागतिकीकरणाचा अर्थ, केवळ व्यापार उद्योगातील वृद्धी किंवा दारिद्रय आणि दहशतवादापुरता मर्यादित असू शकत नाही. शब्दांच्या जागतिकीकरणात तर साऱ्या जगातल्या संस्कृतींना जवळ आणण्याचे सामर्थ्य आहे. पुस्तकेच हे काम प्रभावीपणे करू शकतात, असे महापात्र म्हणाले.

उद्‌घाटन प्रसंगी उपराष्ट्रपती म्हणाले की भारतात बावीस भाषांमध्ये पुस्तकांचे प्रकाशन केले जाते. अमेरिका आणि ब्रिटननंतर इंग्रजी भाषेतील पुस्तकांची निर्मिती करणारा भारतीय प्रकाशनउद्योग, जगातला अग्रेसर उद्योग आहे. गेल्या ५० वर्षांत या उद्योगाने लक्षणीय प्रगती केली असून सार्क देशांची तसेच आफ्रो - आशियाई देशांची गरज भागवण्याची क्षमता, एकट्या भारतीय प्रकाशन उद्योगात सध्या आहे, ही प्रत्येक भारतीयाला अभिमान वाटावा अशी बाब आहे.

■

**(मेहता मराठी ग्रंथजगत - मार्च २००२, पृ. ९)**

## परिषद वार्ता

### १) २००१चा महाबँक पुरस्कार वितरण समारंभ

बँक ऑफ महाराष्ट्र आणि मराठी अभ्यास परिषद यांच्यातर्फे देण्यात येणाऱ्या महाबँक पुरस्कारासाठी यंदा 'A Dictionary of Old Marathi' (डॉ. शं.गो. तुळपुळे आणि ॲन फेल्डहाऊस, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९९) या ग्रंथाची निवड करण्यात आली. डॉ. अंजली सोमण (निमंत्रक) डॉ. द.दि. पुंडे आणि डॉ. सुजाता महाजन यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

'महाबँक' पुरस्कार वितरण समारंभ दि. १४-१-२००२ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे सायंकाळी ५ वाजता साजरा झाला. समारंभाला प्रमुख पाहुण्या या नात्याने डॉ. इरिना ग्लुइकोवा (प्राध्यापक, रशियन पौर्वात्य विद्यासंस्था) उपस्थित होत्या. प्रास्ताविकात कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी परिषदेच्या विविध उपक्रमांची माहिती दिली. परीक्षकांच्या वतीने बोलताना डॉ. द. दि. पुंडे यांनी पुरस्कारप्राप्त ग्रंथाचे वेगळेपण लक्षात आणून दिले. डॉ. ॲन फेल्डहाउस (प्राध्यापक, ॲरिझोना विद्यापीठ, अमेरिका) यांनी पुण्याशी आपले जोडले गेलेले ऋणानुबंध हृद्य शब्दांत प्रकट केले. डॉ. ग्लुश्कोवा यांनी आपल्या भाषणात अर्थपूर्ण विषयाच्या शोधातील आपला प्रवास सहज शैलीत सादर केला. या दोन्ही परदेशस्थ युवतींचे मराठीवरील प्रेम, तसेच प्रभुत्व वाखाणण्याजोगे होते. त्यांच्या एकत्रित उपस्थितीमुळे भाषेचे भावबंध कसे आगळेवेगळे असतात, याचा अनुभव उपस्थितांना आला. प्रा. प्र. ना. परांजपे यांनी अध्यक्षीय समारोपात अमराठी विद्यार्थ्यांना मराठी शिकवतानाचे अनुभव सांगून त्या संदर्भात भाष्य केले. डॉ. मृणालिनी शहा यांनी आभार मानले.

### २) डॉ. केळकरांना 'पद्मश्री' प्रदान :

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष डॉ. अशोक रा. केळकर यांना यंदा २६ जानेवारी रोजी केंद्रसरकारतर्फे 'पद्मश्री' हा सन्माननीय किताब प्रदान करण्यात आला. भाषा आणि शिक्षण या अभ्यासक्षेत्रांतील केळकरांचे कार्य या रूपाने गौरविण्यात आले आहे. त्याबद्दल परिषदेला सार्थ अभिमान वाटत आहे. परिषदेतर्फे डॉ. केळकरांचे मनःपूर्वक अभिनंदन!

■

### ३) श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी - चर्चासत्र

मराठी अभ्यास परिषद, महाराष्ट्र साहित्य परिषद आणि श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी समिती यांच्या संयुक्त विद्यमाने ९ सप्टेंबर, २००१ रोजी चर्चासत्र आयोजित केले होते. प्रा. क्षीरसागरांच्या 'मराठी भाषा : वाढ आणि बिघाड' या पुस्तकावर डॉ. कल्याण काळे यांनी निबंध वाचला. चर्चासत्राचे अध्यक्ष डॉ. द. ना. धनागरे होते.

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी प्रास्ताविक भाषण करून सर्वांचे स्वागत केले. त्यानंतर श्रीमती शकुंतला क्षीरसागर यांनी आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. कल्याण काळे यांनी निबंध सादर करताना "क्षीरसागर हे बहुआयामी व्यक्तिमत्त्व होते लेखक, समीक्षक, पत्रकार अशा विविध भूमिका त्यांनी साकार केल्या", असे गौरवोद्गार काढले.

या निबंधावर चर्चा करताना, डॉ. अशोक केळकर यांनी आपण बोलताना इंग्रजी, हिंदी सर्रास कसे वापरतो हे उदाहरणासह स्पष्ट केले. "तो त्याच्यापेक्षा कमी नाही." किंवा "त्याच्यावर कसलाच असर नाही." ही वाक्ये मराठी वळणाची नाहीत. "वाईफला फिवर आला आहे" हे वाक्य तर हास्यास्पद होते "आम्हांला होप्स आहेत" हे सुद्धा आपण सर्रास वापरतो. अशी अनेक उदाहरणे देऊन क्षीरसागरांच्या प्रतिपादनाचे महत्त्व त्यांनी सांगितले. डॉ. अंजली सोमण यांनी पुढीलप्रमाणे आपले विचार मांडले. "डॉ. काळे यांचा निबंध क्षीरसागरांच्या पुस्तकाच्या सर्वांगाला भिडणारा आहे. धर्मप्रचारकाच्या निष्ठेप्रमाणे श्री. के. क्षीं. नी भाषाविषयक विचार मांडले. क्षीरसागरांची वृत्ती ही रोमँटिक होती. 'टीकाविवेक' या त्यांच्या ग्रंथात रोमँटिसिझम दिसून येतो. काही ध्येय, रोमँटिकपणा, स्वभावातील जिद्द, असे रसायन त्यांच्या स्वभावात दिसते. सावरकर, शिरवाडकर यांच्याप्रमाणेच श्री. के. क्षी. कवी हृदयाचे पण प्रखर विचाराचे व्यक्तित्त्व होते.

डॉ. विद्यागौरी टिळक म्हणाल्या की, सौंदर्यवादी धारणा हा श्री. के. क्षीं. च्या लेखनातील मुख्य घटक दिसतो. सौंदर्यवादाबरोबरच भाषेच्या व्यवहाराची सूक्ष्म जाणीव त्यांच्याकडे आहे. त्यांच्या मते घाईगर्दीने नवीन शब्द वापरणे हे अयोग्य आहे. कारण नवीन शब्दांमुळे डोळ्यासमोर काहीही चित्र उभे राहत नाही. नावीन्याच्या हौसेपोटी नवीन शब्द वापरायला लागलो तर पांडित्यपूर्ण भाषा असेल पण ती अर्थपूर्ण नसेल.

डॉ. श्रीरंग संगोराम यांनी थोडा वेगळा विचार मांडून चर्चा पुढे नेली. "भाषा व्यवहाराची सर्व क्षेत्रे लक्षात घेतली पाहिजेत. वैज्ञानिक, कृषीविषयक शब्द हे घडवावेच लागतात. यासाठी शब्दकोशांची समृद्धी झाली पाहिजे. तत्समीकरणाशिवाय तरणोपाय नाही. फलंदाज, गोलंदाज, भंकस हे शब्द शब्दकोशात आढळत नाहीत."

या चर्चेत प्र. ना. परांजपे हे सहभागी झाले होते. "मराठीची चर्चा सुरू झाली की शब्दांसाठी आपण अडकले जातो. तेच तेच शब्द पुन्हा पुन्हा वापरले जातात. एकदा खोडून काढलेले मुद्दे परत मांडले जातात. ही प्रगती आहे का? परभाषेतून आपण शब्द घेतले तर भाषेचे वैभवच वाढेल. शब्द कोणत्या ठिकाणी कसे वापरले जातात याला महत्त्व आहे. तसेच शब्दांचे वाक्यातील स्थान महत्त्वाचे आहे." असे त्यांनी सांगितले.

"मराठी श्वासोच्छ्वासासारखी आहे आणि इंग्रजी ही अन्नासारखी आहे. अशी प्रतिक्रिया डॉ. कल्याणी दिवेकर यांनी व्यक्त केली. वृत्तपत्रलेखनाचा अनुभव असणारे ल.ना. गोखले यांची मते पाहण्यासारखी आहेत. "वर्तमानपत्राला काही निर्बंध आहेत. शिस्त आहे. वर्तमानपत्रातील मुख्य संपादकाने वर्तमानपत्रातील भाषेच्या शिस्तींकडे, निर्बंधाकडे लक्ष दिले पाहिजे. त्यांनी भाषा या विषयाकडे गंभीरपणाने पाहावे" अशी भूमिका आग्रहाने मांडली.

डॉ. न. म. जोशी, मीरा सुंदरराज यांनी चर्चेत भाग घेतला. डॉ. धनागरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. त्यावेळी ते म्हणाले की, माझे व्यावसायिक जीवन भिन्न असल्याने माझी मते वेगळी आहेत. भाषांमधील प्रतिशब्दांचा शोध घेतला पाहिजे; तो रूजविला पाहिजे पण, ह्यालाही काही मर्यादा आहेत. दुर्बोधता येईल इतपत एखाद्या शब्दाचा आग्रह नको. अभियंता हा शब्द सुरूवातीला दुर्बोध वाटत होता पण तोच आज सर्वत्र रूळलेला दिसतो. भाषेचा अभिमान असावा. भाषाशुद्धीच्या त्या काळातील गरज, मर्यादा जाणून घेतल्या पाहिजेत. लोकांमध्ये जर भाषाभिमान वाढवायचा असेल तर त्या त्या भाषेतील वाङ्मय वाचण्यास लोकांना प्रवृत्त केले पाहिजे. विविध समारंभातून भाषा समृद्ध होत असते."

शेवटी कल्याणी दिवेकर यांनी आभार प्रदर्शन केले.

■

१. **‘मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन’ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे राहतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी - संस्थेला | रु. १२५ फक्त | पंचवार्षिक | रु. ५५० फक्त |
| व्यक्तीला | रु. १०० फक्त | पंचवार्षिक वर्गणी | रु. ४५० फक्त |

२. **आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु.४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

३. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश ‘मराठी अभ्यास परिषद’ या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

३. **मागील अंक :**

‘भाषा आणि जीवन’ हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-

५. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक ‘निवडक भाषा आणि जीवन’ (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच ‘भाषांतरमीमांसा’ हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

६. **जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.



R.N.I.नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

# स्वाक्षरी करा मराठीत

'भाषा आणि जीवन' आता इंटरनेटवरही उपलब्ध
अधिक तपशीलासाठी सूचना फलक पृ. ५० पाहा.

BOOK-POST

प्रति

श्रीमती विजय. ..िवरी वा.३
ई / ५०३, पर्वती नगर, विठ्ठलवाडी,
जकात नाक्याजवळ, सिंहगड रस्ता,
पुणे - ४११०३०

**प्रेषक**

**मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. (दू. क्र. ४४८६०१५)










अनुक्रमणिका